मुद्रकः—ना. द. रेगे, मोहन प्रिंटरी, दादर, मुंबई. २८
प्रकाशकः-गो. ग. रांगणेकर, "तिकोना," १५८ शिवाजी पार्क, मुंबई. २८.





## संमेलनांतून करण्यास योग्य अशा याच लेखिकेच्या एकांकिका

(१) त्या आल्या (पुरुषपात्रविरहित)
(२) 'धू' च्या 'र' चा धूर (पुरुषपात्रविरहित)
(३) बुद्धिबळाचा शह !
(४) दिवा—स्वप्न
(५) सृष्टीचें स्वयंवर (संगीतिका)
(६) जागवूं या ग मंगळागौर (पुरुषपात्रविरहित)
(७) परत दान (तीन अंकी संगीत नाटक)

अनेक स्त्री—समाजांत वरील कांहीं एकांकिकांचे चांगलेच यशस्वी प्रयोग झालेले आहेत. चौकशीसाठीं लेखिकेकडे पत्रव्यवहार करावा.



### आगामी प्रकाशनें

ऐका हं—(मुलांसाठी कथासंग्रह)
ईच्छा मणि— ,, ,,
छोट्याचा मोठा—,, कादंबरी.)
गोलघुमट—(सामाजिक कादंबरी)
बाप तशी बेटी ,, ,,
पुनर्जन्म— ,, ,,
विषांवर उतारा ,, ,,

ॐ

# आंधळी कोशिंबीर !

## (पुरुषपात्र विरहित तीन अंकी संगीत नाटक)

**पात्रसूचि:—**

**राधाबाई:**—मध्यम स्थितींतील एक पोक्त स्त्री.

**लीला:**—राधाबाईंची दुसरी मुलगी, वय १७ स्वभाव पोरकट व प्रेमळ.

**मंगला:**—राधाबाईंची थोरली, मिळवती मुलगी–ही नाटकाची नायिका असून मिळवत्या मुलीच्या लग्नाचा प्रश्न हिच्या भूमिकेवरून सोडविण्याचा प्रयत्न केला आहे.

**रमाकाकू:**—ह्यांचा मुलगा श्रीकांत. त्याचें व मंगलेचें मनाला मन मिळालेलें असतें.

**वीणा:**—मंगलेची मैत्रीण व तिच्या मावशीची पुतणी. अतिशय चतुर व खेळकर तरुणी.

**शारदाबाई:**—वधूमाईची वरमाई होतांच, 'धू' चा 'र' होतांच तो धूर डोळ्यांवर चढविणारी एक सर्वसामान्य पोक्त स्त्री.

**कुसुम:**—त्यांची मुलगी.

शारदाश्रम संस्थेच्या विद्यमानें संस्थेतील भगिनीसमाजातर्फे तेथील नाट्यमंदिरांत ४ सप्टेंबर १९५४ रोजीं रात्रौ ९ वाजतां झालेल्या ह्या नाटकाच्या प्रथम प्रयोगांत पुढील हौशी मंडळींनीं भाग घेतला होता.

**राधाबाई** — सौ. कमल प्रभावळकर.
**लीला** — कु. कुंदा कोर्लेकर.
**मंगला** — सौ. कमल सामंत.
**रमाकाकू** — सौ. मीनाक्षी भट.
**वीणा** — कु. लीला बोळींजकर.
**शारदाबाई** — सौ. सुशीला कोल्हटकर.
**कुसुम** — कु. शकुंतला कुळकर्णी.

**संगीत साथः**— श्री बाळ चावरे, सुरेंद्र नवलकर, वसंत गवाणकर, हेमंत पंडीत, राजा उपाध्ये, रघुवीर राणे व कृष्णराव त्रिजयकर.
(युनायटेड आर्टिस्टच्या सौजन्यानें.)

**दिग्दर्शकः**— श्री. शरचंद्र वि. टिपणीस,
**संगीत नियोजकः**— श्री. बाळ चावरे.

———

॥ ॐ ॥

# आंधळी कोशिंबीर !

## अंक १ ला.

**स्थळ**—चाळीच्या तीन खोल्यांच्या गाळयांतील पुढली खोली. समोरच्या भिंतीला एक जुनें कपाट. खालीं जुनी सतरंजी आंथरलेली व त्यावर एक लांकडी, पाठीचा बांक व दोन खुर्च्या. डाव्या भिंतीशीं एक टेबलखुर्ची. पलीकडे आंतील खोलींत जाण्याचें दार. समोरच्या भिंतीला कपाटाशेजारीं स्वयंपाक खोलींत जाण्याचें दार. व उजव्या विंगकडील भिंतींत जिन्याचा दरवाजा. भिंतीवर टिळकांचा व गांधींचा फोटो, एक ग्रुप फोटो व म्हस्करांचें कॅलेंडर. समोरच्या भिंतीशीं कोपऱ्यांत गाद्यांच्या ३।४ वळकटया रचून ठेवल्या असून बाजूला घडी केलेली आरामखुर्ची आराम करीत आहे. ह्याच भिंतीला एक जुन्या पद्धतीचें घड्याळ आहे व त्यांत साडेसहा वाजले आहेत.

(पडदा उघडतो.)

(राधाबाई स्वयंपाकखोलींतून बाहेर येतात. त्यांची केशवेषभूषा जुन्या काळची. त्या उजव्या बाजूला बाहेरच्या दाराशीं जातात. दार उघडून न्याहाळतात. मग आंत वळून घडयाळाकडे पहातात. पुनः दाराशीं जातात.)

**राधाबाई** :—(डाव्याबाजूच्या खोलीकडे तोंड वळवीत) लीले, अगऽ लीले, इकडे ये बघू जरा. काय करती आहेस ग तूं ?

(लीला प्रवेश करिते. सतरा वर्षांची हंसरी, गोड पोरगी. पांचवारी पातळ व पाठीवर शेपटा.)

**लीला** :—कुंकु लावीत होते मीं. कां हांक मारलीस आई ? काय हवंय तुला ?

**राधाबाई** :—अं–म्हणजे मंगला अजुनि हपीसांतून कशी आली नाहीं म्हणतेय् मीं. साडेसहा वाजले कीं.

**लीला** :—पण आई, आपलं घडयाळ पेन्शनींत काढण्याच्या लायकीचं झाल्यामुळें हल्लीं रोज १०-१२ मिनिटें मागें जातं हें विसरलीस तूं ! ताई खऱ्या साडेसहाला ऑफिसांतून येते, आई.

**राधाबाई** :—(हसून) खरंच कीं ! आपल्या घडयाळाची ही मेली खोड विसरलेच मी ! पण तसं म्हणावं तर, सकाळीं शाळेच्या नि हपिसाच्या

घाईच्या जेवणांच्या वेळीं घड्याळ पुढें असल्याची नेमकी आठवण असते मला--पण संध्याकाळीं मुलंमाणसं घरीं येण्याच्या वेळीं मात्र मीं नेमकं हें विसरते. ( लीला हंसते ) हंसतेस काय ग पोरी? संसाराचे पाश असेच असतात, बाई ! अन् हे पाश कोमल असले तरी त्यापायीं हरघटकेला पडणारे पेंच मोठे कठिण असतात बरं! अन् त्याचमुळं माणसांच्या-विशेषतः माझ्यासारख्या पोक्त बायकांच्या हातून अशी स्मरण, विस्मरणाची घरसोड होते नि तुझ्यासारख्या अननुभवी मुलींना हंसायला येतं !

**लीलाः**—इश्श आई, म्हणून नाहीं कांही मीं हंसलें-ताई ऑफिसांतून येण्याच्या वेळीं रोजच तूं अशी आंत, बाहेर करतेस त्याची गंमत वाटली मला! पण खरंच, आई, तूं फारशी शिकलेली नसतांना आतां स्त्रियांच्या वागण्याचं किती छान विवेचन केलंस ग !

**राधाः**—त्याचं असं आहे लीले, अनुभव हा मोठा हुषार मास्तर आहे ! अन् त्याच्या तालमींत माणसांनां बरं, वाईट, हवं असलेलं, नको असलेलं, सारं शिक्षण मिळतं ! अन् हें बघ, आमच्या लग्नानंतर वर्षभर रोज मला इकडून शिकवणं होत असे !

**लीलाः**—खरंच ? अन् आई, बाबा आम्हांला शिकवतांना कधीकधीं रागवत नि अजुनि रामूला नि विमलेला रागवतात तसं तुलाहि रागवत काय ग ?

**राधाः**—छे ! अन् लीले, माणूस उगीच रागवत नसतं हो ! खरं म्हणजे, इकडून शाळामास्तर असायचं त्यामुळें शिकविण्याची हातोटी छान साधलीय् नि त्यावेळीं अंगावर विशेष जबाबदाऱ्या नव्हत्या,चिंता काळजी नव्हती! त्यामुळें वागणं कसं थंड असे. आतां चहूंकडून दगदगल्यामुळें राग लौकर येतो.

**लीलाः**—असेल हं ! कारण बाबांनीं आपल्याला कध्धीं मारलं नाहीं असं आपल्या बाळपणींच्या आठवणी काढतांना ताई सांगते हं कधींकधीं !

**राधाः**—अन् अगदीं खरं हो, तें! बाकी, मंगला होतीसुद्धां भारी गुणी !

**लीलाः**—ए आई, मग त्या वर्षभरांत काय, काय शिकलीस ग तूं ?

**राधाः**—रोजचा हिशेब व्यवस्थित मांडायला शिकलें अन् वाचन तर खूपच वाढलं होतं माझं ! हरिभाऊ आपट्यांच्या सगळ्या कादंबऱ्या वाचून काढल्या होत्या मीं ! ( उल्हसितपणें ) त्यांची ती 'उषःकाल' कादंबरी, अन् 'पण लक्षांत कोण घेतो' ही यमूची करूण कहाणी, अन्-छेः बाई ! आतां त्या कादंबऱ्यांचीं नांवसुद्धां विसरलें मी-

**लीलाः**—अन् आई, हें आम्हांला सांगायलासुद्धां विसरलीच होतीस तूं!

**राधाः**—( खिन्न स्मित करून ) हं ऽ! अग, माझं मीहि विसरलेंच होतें! लीले, मघां विस्मरणाबद्दल मी तुला सांगितलं ना, तें हेंच बरं! अग, माणूस एकाद्या लांबच्या प्रवासाला पायीं निघाला म्हणजे प्रारंभीं तो कसा हुरूपानें चालत असतो, आजूबाजूच्या रम्य वनश्रीचं त्याला किती कौतुक वाटत असतं. पण पुढें तेंच तें सुरू झालं कीं अंमळ रंजीस येतो तो. पहिला हुरुप मावळूं लागतो! तीच गत असते संसारी माणसांची! नि त्यांतून ह्या महिन्याची त्या महिन्याशीं तोंडमिळवणी करण्यासाठीं धडपडणाऱ्या आमच्यासारख्यांची! संसाराच्या सुरुवातीला केलेले एकेक बेत कोसळलेले पाहूनहि माणसाला कसं ग वाईट वाटल्यावांचून राहील? त्याच्या वागण्या, बोलण्यांत थोडा कडवटपणा यायचाच!

**लीलाः**—पण आई, मी कुठंतरी वाचलंय कीं, माणसानें गतकाळच्या रम्य घटना आठवून वर्तमानकाळीं समाधान मानावं!

**राधाः**—हे तोंडाने सांगायला सोपं आहे, लीले! पण तसं करणं जमत नसतं बरं! केव्हां केव्हां तसली तुलना अगदी असह्य वाटते! त्यापेक्षां माझं हें विस्मरणच अधिक बरं! हुं ऽऽ! ( निःश्वास सोडतात. )

**लीलाः**– (विषयांतर करण्यासाठीं ) आतां खरे साडेसहा वाजत आले हं. ताई येईल इतक्यांत.

**राधाः**– अन् लीले, तुझ्या लक्षांत आहे कां? आज मंगलेचा पहिला पगार मिळणार! एकशें वीस रुपये!

**लीलाः**– खरंच, आई, आपली मंगलाताई मुलगा असती तर किती बरं झालं असतं, नाही? होऽ म्हणजे ती आपली जन्मभर नोकरी करूं शकली असती!

**राधाः**– अन् मुली नाहीं कां जन्मभर नोकरी करूं शकत? अग, मिळवती मुलगी ही मुलाच्या ठिकाणींच असते!

**लीलाः**– पण ताई आतां वीस वर्षांची आहे. मग यंदा किंवा पुढल्या वर्षी तिचं आपल्या रमाकाकूंच्या श्रीकांताबरोबर लग्न होईल ना? मग...

**राधाः**– (घाईनें) लीले, बघ ग, ताई दिसतेय् कां? कोर्टांतल्या त्या हपीसांतून ती इथें घरी येईपर्यंत माझ्या जीवांत जीव नसतो गऽऽ बाई! (पुनः पुनः इकडून तिकडे तुरु तुरु फिरतात.)

**राधाबाई**:—लीले, इकडे ये बघूं. किती दिवस तुला सांगेन, सांगेन म्हणते पण विसरतेंच. आज बरी आठवण झाली! अग, आतां आज ना उद्यां तुझ्या लग्नाच्या तजविजीला लागायला हवं.

**लीला**:—पण ताईचं लग्न झाल्यानंतर ना?

**राधा**:— तें आधीं नि नंतर मग पाहूं या. मी सांगतें तें आधीं ऐक. हं! तर तुला कुणीं पहायला आलं म्हणजे साहजिकच तुला गाणं येतं कां असं विचारणार. त्यासाठीं मंगलेकडून दोन गाणीं तरी शिकून घे.

**लीला**:—गाणीं? मला नाहीं ग तें जमत? तूं मला वीणकाम, भरतकाम करायला सांग. हव्वं त्या नवीन, नवीन धर्तीचं उत्तम करीन मीं! पण गाऽणं? उंहुं! आपल्याला नाहीं बाई, तें साधत!

**राधा**:– अन् मंगला कशी ग शिकून, संवरून, वीणकाम, भरतकाम करून गाणंहि सुंदर म्हणते?

**लीला**:– ताई ना? तिची सर कुणालाच यायची नाहीं! खरंच, आई आपल्या ताईच्या अंगांत सगळे गुण आहेत, नाहीं? म्हणून ती कधीं कधीं नें गाऽणं म्हणते ना, 'ही नार रुप सुंदरी' त्यांतलं ते कडवं बघ, 'होईल पाहतां हिला कुणाची नजर' तें किनई, मला ताईच्या बाबतींत फार पटतं! खरंच, नजर लागण्यासारखीच आहे माझी मंगलाताई! अन् आई, मला मग असं वाटतं कीं, ती कुणा भाग्यवंताची लक्ष्मीबाई होणार आहे बरं...

**राधा**:– पण लीले, तिच्या सारखे गुण तुझ्या अंगीं कां येऊं नयेत ग? तूं बहीणच आहेस कीं तिची.

**लीला**:– पण आई, मीं धाकटी बहीण आहे ना तिची! मग सर्व बाबतींत मी तिच्यापेक्षां धाकटीच--कमीच रहाणार!

**राधा**:– छान! मग ती माझी मुलगी आहे तेव्हां माझ्यापेक्षां तर ती किती तरी लहान! अन् असं असून अनेक बाबतींत ती माझ्यापेक्षां किती हुषार आहे! मग ग?

**लीला**:– वाः! अशी आईलेकीची तुलना करायची नसतेच मुळीं! अन् आई, तशी तुलनाच करायची तर ताई तुझी लेक असली तरी पुढली पिढी ना ती? मग ती पुढें जायचीच!

**राधा**:-अग लब्बाडे! लहानपणापासून तूं अश्शीच! बोलण्यांत कुणाला हार जायची नाहींस!

**लीला**:–अन् अभ्यासांत मात्र घोडं पेंड खातं ! असंच ना आई ?

**राधा**:–अग, हाताचीं पांचहि बोटं कां सारखीं असतात ? पण लीले, मूळ मुद्दा विसरूं नकोस हं ! अग, मला तुमचं शाळेतलं शिक्षण कांहींच मिळालं नाहीं लहानपणीं, पण चांगलीं पांच, पन्नास गाणीं मात्र मीं घडाघड म्हणत असे हो.

**लीला**:— मग आई, तूंच शिकव कीं मला त्यांतलंच एकादं ! नाहींतरी ताई हल्लीं घरीं नसतेच. सकाळीं दहा ते संध्याकाळीं सहा तिचं तें ऑफिस ! पण तूं नि मीं मात्र दुपारभर दोघीच घरीं असतों. तेव्हां गाण्याचा क्लास उघडूं या आपण त्या वेळीं. तूं मास्तरीण नि मीं शिष्या ! हं. बाई, आतां शिकवा ना. स्वर लावूं कां ? आऽ आऽऽ आऽऽऽ ——

**राधा**–( हंसूं आवरीत ) किती ग पोरकटपणा करावा, लीले ?

**लीला**:–पोरकटपणा नाहीं ग आई ! तुला जर खरंच तशी आवश्यकता वाटत असेल तर शिकव ना मला गाणं. आतांच करूं या प्रारंभ ! म्हणजे अजुनि ताई कशी आली नाहीं. ही तुझी भुणभुण तरी त्या गुणगुणण्यांत थांबेल !

**राधा**:–लीले, मस्करी नव्हे हं. पण मुलीच्या जातीला गाणं यायलाच हवं ! अग पुढें मुलांबाळांना झोपवतांना अंगाई गीत तरी म्हणायला आलं पाहिजे !

**लीला**:–पण आई, माझ्यासारख्या भसाड्या आवाजांत अंगाई गीत म्हटलं तर मूल झोपण्याऐवजीं किंचाळून उठेलच उलट ! ( हंसते )

**राधा**:–लीले, तुला गाणं शिकायचंय् कीं नाहीं ?

**लीला**:–शिकायचंय् तर ! आतां अगदीं गंभीर होते हं मीं ! तूं गाणं म्हण मीं तें पाठ करतें.

**राधा**:–( बांकावर बसून घसा खांकरीत ) उहुम् ! ऐक तर— 'ही वस्त्रें भूषणें ल्यावींत सखये सुमनांनीं वेणी भरी ग । सखे तुझें स्वयंवर या मासीं राजा करी ग । सखे तूझें स्वयंवर या मासीं राजा करी ग ।

**लीला**:–गाणं छान आहे ग हें. चालहि ठीक आहे. पण आई, पहायला आलेल्या माणसांनां असलं स्वयंवराचं गाणं कसं ग म्हणून दाखवायचं ? हें नको बाई. दुसरं म्हण एकादं छानसं ! अं ?

**राधा**:–दुसंरऽ ? अं – उं – – हं ! ' कमललोचना, पुतनाशोषणा भृगुची हृदयीं खूण । तुमच्या अंगा रुतलं सांगा कुणाचं कांकण ॥ काजळ, कुंकु, हळद लागली कुठून तुम्हा श्रीपती—

**लीला**:-बाई, बाई ! आई, अग, तुझ्या लहानपणीं कृष्णाच्या नांवाखालीं चांगलीच शृंगारिक गाणीं म्हणत होतां कीं तुम्हीं ! छेः छेः ! असलं नको बाई !

**राधा** :— हेंहि नको ! बरं, हें तरी ? ' कोणे एके दिवशीं विनोदानें हरिसी बोले रुक्मिणी । कृपा करोनिं मज सांगावें काळे कां हो मी गोरी ।

**लीला** :— अन् आई, मी गोरी नाहीं हें मला पहायला आलेल्या मंडळींच्या नेमकं लक्षांत नाहीं कां यायचं ह्या गाण्यामुळें ? नको बाई, हा काळया गोऱ्याचा वाद !

**राधा**:— बाई, बाई ! लीले, तूं दमवतेस हो मला.

**लीला** :— पण आई, इतकीं पन्नास, साठ गाणीं तुला येतात. मग आणखी एकादं काढ कीं तुझ्या भांडारांतून—

**राधा** :— आणखी ? —अं—हं —हें ऐक—' सुरेख संगम किती । सुरेख संगम किती । कृष्णा भेटली कोयनेप्रति । सवेग । सुरेख संगम किती ।

**लीला** :— हं ! हें छानच आहे हं ! फार आवडलं मला ! अन् आतां ताई ऑफिसांतून आली ना, म्हणजे तिला मिठी मारून मी म्हणेन कीं, ' लीला भेटली मंगलेप्रति । आई ग । सुरेख संगम किती ।

**राधा** :— लीले, तूं जन्मभर अशीच पोरकट राहाणार काय ग ?

**लीला** :— हंऽ ! जन्मभर पोरकट रहाण्याचं भाग्य माझ्या नशिबीं असलं तर आणखी काय हवं ?

**राधा** :— पण वयपरत्वें माणसानें थोडं गंभीर नको कां व्हायला ?

**लीला** :— हुं ! ती काळजी नको, हं आई ! परिस्थिति तें साऽरं शिकवितेच कीं माणसाला ! अन् आई, तूं त्या ठमाबाईसारखंच बोललीस हं आतां.

**राधा** :— ठमाबाईसारखं ? म्हंजे ग काय ?

**लीला** :— अग, आपल्या मुलींनां सासरीं जाच झाला तर तो निमूट सोसण्याची त्यांनां संवय व्हावी म्हणून त्या ठमाबाई माहेरींहि मुलींनां रोज जाच करतात ना म्हणे ! त्यांतलाच प्रकार हा !

**राधा** :— लीले, तूं हंसूं, खेळूं नयेस असं नाही हं माझं म्हणणं.

**लीला** :— पण मी हंसावं, खेळावं असंहि नाहीं तुझं सांगणं ! खरं ना ? अरे वाः ! ताई आली ग ऽ आई !

( तरुण, सुंदर मंगला मंद पावलांनी येते. कोपऱ्यांत चपला व छत्री ठेवते. व खांद्यावर अडकवलेली पर्स हातांत घेत टेबलाकडे जाते. )

**राधाः**—आलीस एकदांची ! केव्हांपासून वाट बघतेयत मीं तुझी !

**मंगलाः**— केव्हांपासून वाट पहाण्यांत काय अर्थ, आई ? नोकरी करणारी माणसं नेमल्या वेळींच घरी यायची ! यंत्रबद्ध जिणंच मुळीं तें !

**लीलाः**—( तिच्या हातांतील पर्स घेण्यासाठीं हात पुढें करीत) दे ताई ती पर्स. मीं ठेवतें नेऊन आंत. (मंगला पर्स लीलेच्या हातीं देणार इतक्यांत )

**राधाः**— पगार मिळाला कां आज ?

**मंगलाः**— हो मिळाला. (पर्स मधून एक पाकीट काढून घेऊन पर्स लीलेकडे देते) हं, हे घे. एकशें वीस रुपये आहेत. (पाकीट राधाबाईकडे देते. )

**लीलाः**— ताई, सगळाच्या सगळा पगार आईकडे देणार तूं ? तुला हात खर्चाला नको कां कांहीं ?

**मंगलाः**—( हंसून ) मला कसला ग आलाय वेगळा खर्च ? येतांजातांच्या ट्रॅमसाठीं तीन आणे नि चहाला एक आणा असे चार आणे आई रोज देते कीं मला.

**लीलाः**—पण ताई, तूं मिळवतेस रोजीं चार रुपये.

**राधाः**—आतां उद्यां दूधवाल्याची थकलेली बाकी नि डॉक्टराचं गेल्या महिन्याचं बिल आधीं देऊन टाकलं पाहिजे ! (लीला मंगलेकडे पाहून स्मित करते व डाव्या हाताच्या खोलींत पर्स ठेऊन येते.) लीले, हें बघ, आपल्या त्या पुरोहितांच्या दुकानांतून रत्तलभर पेढे घेऊन येशील कां ?

**मंगलाः**—पेढे ? नि तें कशाला ग आई ?

**राधाः**— वा ! आज तुझा पहिला पगार आला. मग सगळ्यांचीं तोंडं नको कां गोड करायला ? शेजारच्या चार घरीं चार, चार पेढे हवेत धाडायला !

**मंगलाः**—शेजारीं, पाजारीं धाडणार तूं पेढे ? नको ग आई.

**राधाः**—तें ग कां ? पुरुषांच्या बरोबरीनें मिळवती झाली आहेस तूं ! मग कौतुकास्पदच नाहीं कां हें ?

**मंगलाः**--आई, गरजेच्या पोटीं कांहीं गोष्टी करणं भाग पडतं ! त्यांत कौतुक करण्यासारखं काय असतंय् ? अन्- अन् आई, निदान रमाकाकूंकडे तरी पेढे नको बाई, पाठवूं.

**राधाः**—काय ? रमाकाकूंकडे नको पाठवूं ? तें ग कां ? वा ! त्यांचा नि आपला केवढा घरोबा ! अन् इतरांकडे देऊन त्यांच्याकडे धाडले नाहींत तर त्यांना वाईट नाहीं कां वाटणार ?

**मंगला**:-- ( अडखळत ) पण—पण आई, तोंड गोड करण्यासाठीं म्हणून त्यांच्याकडे तूं पेढे पाठवलेस कीं—कीं-- त्यांना वाटेल कीं—मंगलेला नोकरी करणं गोड वाटतंय् !

**राधा**:--मग तुला गोड नाहीं कां वाटत ? आतांच काय ते सांग, बाई ! महागाई भत्ता धरून इकडे अवघा पावणे दोनशें पगार मिळतो ! दोन शिकवण्या करीत असत, तर गेल्या महिन्यांत तो मेला ताप आल्यापासून अशक्तपणा भारीच वाटतोय् म्हणून त्या सोडल्या, अन् नोकरी करण्याबद्दल तुला सुचविलं. तुलाहि तें त्यावेळीं पटलं ! तूंच बघ, मंगले, महागाई म्हणजे कोण्या प्रकारची ! आजवर कसं तरी निभावलं ! पण आतां नाहीं बाई, भागत ! तुझ्या पगाराची केवढी मदत होईल आम्हांला ! पण तुला नसलंच नोकरी करणं आवडत तर तसं स्पष्ट सांग. नुकत्याच सोडल्या त्या शिकवण्या पुनः धरायचं होईल ! म्हणून म्हणते, आतांच काय तें कळूं दे. म्हणजे परवां सोडलेल्या शिकवण्या लगेच सांगितलं तर हातीं तरी लागतील ! सांग बाई, काय तें !

**मंगला**:- तसं नव्हे ग आई, नोकरी करण्याबद्दल कांहींच म्हणणं नाहीं माझं. पऽण (एक निःश्वास सोडते. व लगेच मुद्दाम हंसते) ठीक आहे ! तुला हवं तें कर.

**राधा**:--आतां कसं बरं बोललीस ! अन् लीले, मींच घेऊन येते हो पेढे. लहान, लहानसे निवडून आणायला हवेत म्हणजे अधिक पुरवठ्याला येतील. तुला नाहीं तें जमायचं ! बरं, मंगले, हात, तोंड धू. लीली देईल तुला चहा करून. आत्तां येतें मीं. ( कपाटांतलि पत्र्याच्या पेटींत मंगलेचा पगार ठेऊन सुटे दोन रुपये कनवटीला लावून जातात. )

( मंगला मंद पावलांनीं टेबलाकडील खुर्चीवर येऊन बसते )

**लीला**:—ताई, थकलीस होय ग ? ( प्रेमानें तिच्या खांद्यावर हात ठेवते. )

**मंगला**:--नाहीं ग. काम केल्यानें मला मुळींच थकवा वाटत नाहीं ! त्यावेळीं विचारांनां पूर्णविराम असतोय ना ? मग थकवा कशाला येणार ? ( एक सुस्कारा सोडते. )

**लीला**:--ताई ग, इतके त्रासदायक वाटणारे कसले विचार तुझ्या डोक्यांत येतात ? अं ? मला सांग ना.

**मंगला**:– (आपल्या खांद्यावरील लीलीच्या हातावर थोपटून) तुला ? तूं अजुनि लहान आहेस, लीले.

**लीला**:– लहान ? सतरा वर्षं पुरी झाली मला, ताईसाहेब ! म्हटलं, तुझ्यापेक्षां अवघी तीनच वर्षांनी लहान आहे मीं !

**मंगला**:– (बळेंच हंसून) अगगग ! खरंच कीं ! आमची लीली केवढी मोठी झालीय आतां ! तिला आतां सगळं कळतं !

**लीला**:– कळतंच मुळीं ! तुला त्रासदायक वाटणारे विचार रमाकाकूंच्या श्रीकांतासंबंधीं असतात हें ठाऊक आहे बरं मला ! (मंगला चपापते.)

**मंगला**:– (आवेगानें) लीले, लीले, काय बोलतेस हें ? पुनः कध्धीं असं बोलूं नकोस हं ! (थकलेल्या स्वरांत) हंऽ ! तें-तें-स्वप्न होतं एक ! पण आतां तें संपलं ! ऐकलंसना लीले, तें आतां संपलं !

**लीला**:– पण कां संपावं, म्हणते मीं ? तूं अविवाहित आहेस, श्रीकांतहि अविवाहित आहेत. मग अडलं कुठें ?

**मंगला**:– (विषयांतर करीत) हो खरं, लीले, तें सागर- सरितेचं गाणं म्हणण्याचा आग्रह करीत होतीस ना तूं मला काल ? तें म्हणून दाखवते हं तुला आतां.

**लीला**:– ताई, हें तूं मुद्दाम विपयांतर करते आहेस बरं कां.

**मंगला**:– गाणं ऐकायचंय् ना तुला लीले ?

**लीला**:– पण ताई, हात, तोंड धुऊन चहा तरी घे आधीं.

**मंगला**:– घेतें अंमळशाने. रोज सकाळीं घड्याळावर एक डोळा ठेऊनच चहा, आंघोळ, जेवण आटपावं लागतं ! आतां जरा चैनींत बसते ग थोडा वेळ. (आळस देते.)

**लीला**:– मग गाणं म्हणायचा त्रास नाहीं कां तुला वाटणार ?

**मंगला**:– गाणं म्हणायचा अन् मला त्रास ? लीले, विसरलीस तूं ? गाणं म्हणणं म्हणजे माझा मोठ्यांतला मोठा आनंद ! अन्-

**लीला**:– अन् काय ताई ?

**मंगला**:– अं- अं- कांहीं नाहीं ग ! बरं, पण गाणं म्हणूं ना तें ?

**लीला**:– आज मोठ्ठंच नवल म्हणायचं ! पुनः पुनः आपण होऊन आमच्या लाजाळु अन् अबोल ताईसाहेब गाणं म्हणूं कां असं विचारताहेत मला ! (हंसते, पण मंगला हंसत नाहीं.) ताई, रागावलीस मीं मस्करी केली म्हणून ?

**मंगला**:– छे ग ! तुझ्यावर कां बरं रागावेन मीं ? (मंद स्मित करते.)

**लीला**:– मग आतां म्हणतेस तें गाणं ?

**मंगला**:– हो. म्हणते हं. (गाते)

(चाल– चंद्रकांत राजाची)

**सागरराजा मिळतां त्याची मुग्ध सखी सरिता ।**
**पर्वताकडे वळेल कां ती ? जरि त्याची दुहिता ॥**
**निसर्ग शिकवी धडा आपुल्या सरिता कन्येसी ।**
**अनुकरण तिचें करिती मानवकन्या वेगेंसी ॥**
**प्रेमळ सासरीं रमलेली ती भाग्यवंत तरुणी ।**
**मायेच्या माहेरा जाते नकळत विसरोनि ॥**
**पित्यापरिस पति प्रिय गमणें हा नियम निसर्गाचा ।**
**नियमें त्याच अखंडित चाले क्रम संसाराचा ॥**
**एका पुढतीं दोन चित्रें जणुं चौकटिंत एका ।**
**माहेरापुढतीं सासर चित्तिं तिच्या अवलोका ॥**
**नच नवलाचें, नच अयोग्यतें ; दिसे रीत जगतीं ।**
**कीं मायेचा ओघ धांवणें पुढतीं अन् पुढतीं ॥**
**सागरराजा मिळतां त्याची प्रिय सखी तीऽ सरिऽता ॥**

**मंगला**:–(गाण्यांत गुंगल्यामुळें लीलेच्या अस्तित्वाचें भान विसरून) हंऽ ! पण सगळ्याच सरिता कुठें सागराला मिळतात ? कांहीं सरिता जागच्याजागींच आटून जातात !

**लीला**:–(डोळे पुसून) पण ह्या सरितेनें असं जागच्याजागीं कां आटून जावं, म्हणते मीं ? ताई ग, तूं अशी स्वतःची कुचंबणा कां करते आहेस ?

**मंगला**:–(स्वतःला सांवरीत) कुचंबणा ? छेः ! लीले, काय भलतीच कल्पना ही तुझी ? अग, मला तूं एकाद्या नाटक कादंबरीतली नायिका समजते आहेस कीं काय ?

**लीला**:–हें बघ ताई, मीं काय समजावयाचं तेंच समजतेंय हो ! ताई, श्रीकांताशीं लग्न करण्याची तुझी इच्छा आहे हें मला चांगलं ठाऊक आहे ! नि श्रीकांतांचीहि तीच इच्छा आहे ! पण आईबाबा हल्लीं आंधळीं कोशिंबीर खेळताहेत नि तुला खेळायला लावताहेत !

**मंगला**:–लीले, तूं चुकते आहेस. मी मुळींच आंधळी कोशिंबीर खेळत नाहीं.

**लीला**:–मग डोळे असून तुला कां दिसत नाहीं ग ?

**मंगला**:–हंऽ ! लीले, संसारांत अनेकदां माणसाला डोळे असून पहायचं नाहीं, कान असून ऐकायचं नाहीं नि तोंड असून बोलायचं नाहीं असं वागावं लागतं ! माणसाच्या अनेक कर्तव्यांपैकीं तें एक कर्तव्य असतं !

**लीला**:–( त्राग्यानें ) कर्तव्य असतं म्हणे ! असलं कसलं हें जीव घेणारं कर्तव्य ?

**मंगला**:–( शांतपणें ) नाहीं बरं, लीले, आईवडिलांचं ऋण फेडणारं कर्तव्य आहे हें ! तुला हें सहजासहजीं नाहीं पटणार. कारण तूं आईबाबांची वडील मुलगी नाहींस ! वडील मुलीवर केवढी मोठी जबाबदारी असते तें तुला कसं कळणार ? म्हणून म्हणते लीले, तूं माझ्यासाठीं मनाला त्रास करून घेऊं नकोस ! मीं नेहमींसारखी खातेय् पितेय्. अगदीं ठीक आहे !

**लीला**:–ताई, शरीराला अधिक किंमत असते कीं मनाला अधिक असते ग ?

**मंगला**:–हुं ! लीले, आपल्यासारख्या मध्यमस्थितींतल्या माणसांनां मन नसतचं मुळीं ! आजकाल मन ही एक ऐषआरामाची चीज मानली जाते व म्हणून तिच्यावर श्रीमंतांचीच मिरासदारी चालते ! ( मंगला गंभीर होते. )

**लीला**:–( मंगलेला हंसविण्यासाठीं ) मग, 'फक्त श्रीमंतांसाठीं' असं लेबल् लावायला हवं त्या मनाला ! (दोघी हंसतात) अन् काय ग ताई, ही ऐषआरामी चीज आजकाल काळ्या बाजारांत गेलीय् कीं काय ? म्हणजे मात्र ती आपल्याला दुर्मिळ खासच ! ( हंसत बाहेरच्या दाराकडे बघते ) अरे, आई आलीसुद्धां पेढे घेऊन.

**राधा**:–( पदरानें वारा घेत ) हुऽश्र ! हं, आणले बाई, पेढे. पण किती महागलेत ग हल्लीं ! अडीच रुपये रत्तल ! मीं आपले बारीक, बारीकसे अर्धा रत्तलच आणले ! धर, मंगले, ठेव तूं हे देवापुढें.

**मंगला**:–मींच कशाला ठेवायला हवेत ? तूं ठेव कीं !

**राधा**:–छेः छेः ! तुझ्या पहिल्या पगाराचे पेढे हे ! तूंच ठेवायला हवेत ते देवापुढें !(तोंडभर हंसून) म्हणजे तुला किनई, लौकर, लौकर बढती मिळेल हो !

( मंगला एक निःश्वास सोडते. एवढ्यांत लीला आपल्याकडे पहाते आहे हें तिच्या लक्षांत येते व ती बळेंच हंसते. एवढ्यांत रमाकाकू येतात. त्याबरोबर मघांपासून नको, होय करणारी मंगला पट्कन राधाबाईंच्या हातांतले पेढे घेऊन आंत जाते. लीलाहि तिच्यामागून जाते. )

**राधाः**–या, रमाकाकू, बऱ्या अनायासें तोंड गोड करायला आलांत हो.

**रमाः**–तोंड गोड करायला ? अन् तें कशासाठीं हो ? मघां तुम्हांला घाईघाईनें बाहेर जातांना पाहिलं मीं. म्हटलं, एवढ्या तिन्हीसांजा राधाबाई कुठें अन् कां गेल्या तें तरी पाहूं या म्हणून झट्‌कन आलें मीं !

**राधाः**–( हंसून ) अहो, आमच्या मंगलेचा पहिला पगार झाला आज म्हणून पेढे आणलेत हो. आतां तुमच्याकडे धाडणारच होतें मीं विमलेबरोबर.

**रमाः**–( खिन्नपणें ) हं ऽ ! खरं म्हणजे, मंगलेच्या लग्नाचे लाडू द्यायचेत तुम्हीं- आतां वीस वर्षांची झाली कीं ती.

**राधाः**–( हंसून ) खरंच कीं ! किती भराभर दिवस जातात, बाई ! बघतां, बघतां मंगला वीस वर्षांची झाली. नि तीन, तीन वर्षांचा पाळणा माझा. तेव्हां लीला झाली असणार सत्रा वर्षांची, रामू चौदाचा नि विमली अकराची !

**रमाः**–मग आतां लग्न कधीं करणार मंगलेचं ?

**राधाः**—( उगीचच हंसून ) हंऽ अहो, आजकाल वीस वर्षाला लग्न करतंय कोण ? अन् मुलीच जर इतक्यांत लग्न नको म्हणतात तर आपण काय हात, पाय बांधून कां त्यांचं लग्न करायचंय् ? अहो रमाकाकू, आपले कां दिवस आहेत आतां ? आतांच्या मुली शिकलेल्या, शहाण्या ! त्यांनां हवं असेल तरच लग्न करणार त्या ! आतां हेंच बघा कीं, आमची मंगला मुळीं लग्नच करायचं नाहीं म्हणतेय्.

**रमाः**—( नवलानें ) काय ? मंगला असं म्हणतेय ?

**राधाः**—तर हो ! आतां तुमच्यादेखत विचारतें हवं तर तिला ! तुमची खात्री होऊं द्या. मंगले, एऽ मंगलाताई, इकडे ये बरं जरा.

**लीलाः**—( प्रवेश करीत ) काय ग आई ? ताई हात, तोंड धुतीय. अन् हे घे पेढे.

**राधाः**—म्हंजे ? देवापुढें ठेवले ते ?

**लीलाः**—हो.

**राधाः**—हो काय ? अग, मंगला जर आत्तां हात, तोंड धुतीय म्हणतेस तर पेढे देवापुढें ठेवले कुणीं ?

**लीलाः**—मीं ठेवले.

**राधाः**—काय ? तूं ठेवलेस ? म्हणजे ग काय ?

**लीलाः**—मग ? ताईच्या पगाराचा, खरं म्हणजे, तिच्यापेक्षां आपणां

सर्वांनांच अधिक उपयोग होतो ! तेव्हां ते पेढे देवापुढें मीं ठेवणंच योग्य ! अन् आई ताईला लौकर, लौकर बढती देण्याबद्दल मात्र नाहीं हं मीं देवाला सांगितलं. म्हणजे मुद्दामच तसं सांगितलं नाहीं !

**राधाः**—तें कां ग बाई ?

**लीलाः**—अग, म्हणजे असं कीं, ताईला बढती मिळाली कीं, तिला नोकरी सोडूं न देण्याचा अधिकच मोह पडेल ना आपल्याला ? नि मग तिचं लग्न कसं ग होईल ?

( रमाबाई गालांतल्या गालांत हंसतात. )

**राधाः**— ( त्राग्यानें ) लग्न ! अग पोरटे, तूं मारे ताईचं लग्न करायला निघशील पण तिला कुठें तें करायचंय् !

**लीलाः**—( साळसूदपणें ) हो ! ३।४ वर्षांपूर्वी त्या तिंबुनानांनीं तिच्यासाठीं कोणसा तो बिजवर कां तिजवर सुचवला होता तो ताईनें नाकारला होता खरा ! पण आई, ह्या रमाकाकूंच्या श्रीकांताला नाहीं हो ती नाकारायची. मला चांगलं ठाऊक आहे !

**रमा**—( आनंदानें ) होय ना ? मी हा तर्क केलाच होता. ऐकलंत ना राधाबाई, कशाला उगीच डोळयावर कातडं ओढतां ? अं ? ही आंधळी कोशिंबीर आतां पुरे नाहीं कां झाली ? होऊं द्या ना मुलांच्या मनांसारखं.

**राधा**—आतां काय म्हणावं तुम्हांला रमाकाकू ? ही पोरगी सांगते नि तुम्हीं ऐकतां. थांबा, मी मंगलेलाच बोलावतें इकडे. मंगले, बाहेर ये बरं.

**वीणा**—( प्रवेश करून ) म्हटलं येऊं कां मी ! अन् काकू, मंगलेला हांका कां मारीत होतां ?

**राधा**—( गोंधळून ) अं-हांका होय ! अग, तूं आलीस म्हणून बोलावलं तिला बाहेर-

**वीणाः**—अन् मीं येण्याच्या आधींच त्यासाठीं हांका मारल्यात तिला ? ( रमाकाकू हंसूं दाबतात )

**राधाः**—( आणखीच गोंधळून ) अं-अं-हो-रमाकाकू, ही वीणा बरं कां ! माझी थोरली बहीण नबुताई आहे ना, तिची सख्खी पुतणी ही !

**मंगलाः**—(प्रवेश करून) काय ग आई ? कोण वीणा ? अरे वाः ! केव्हां आलीस ग वीणे ?

**वीणाः**—ही आतां येतेय् एवढीच ! काकूंनीं तुला आतां हांका मारल्या ना तेव्हांच आलें मी. ( राधाबाईकडे बोट करून ) ह्या म्हणतात कीं, मीं आधीं आले नि ह्यांनीं नंतर तुला हांका मारल्या नि मला वाटतंय् कीं, ह्यांनीं

हांका आधीं मारल्या नि मी नंतर आलें ! पण तें कांहीं असलं तरी तूं घरीं भेटलीस हें छान झालं !

**मंगला**:—कां ग ? कांहीं काम आहे होय माझ्याकडे ?

**वीणा**:—काम नाहीं. म्हटलं, फिरायला जाऊं या जरा आपण. किती दिवसांत मिळून फिरायला गेलोंच नाहीं !

**राधा**:—कुठेंसं जाणार ग तुम्हीं फिरायला ?

**वीणा**:—आणखी कुठें काकू ? हँगिंग गार्डनवर जाणार नेहमींप्रमाणें.

**राधा**:—तिथें ! नको बाई ! इकडून म्हणणं होतं कीं, आजकाल संभावित मुलींबाळींनीं तिथें हिंडायला जाण्याची सोयच नाहीं !

**वीणा**:—तें हो कां ?

**राधा**:—(साळसूदपणें) अग, (रमाकाकूंकडे तिरपा कटाक्ष टाकीत) कांहीं टारगट पोरगे म्हणे मुद्दाम मुलींच्या मागावर येतात त्या बागेंत ! समजलीस ?

( वीणा व मंगला समजावयाचें तें समजतात )

**वीणा**:—( मोठ्यांदा हंसून ) अहो, काकू, तुम्हीं असं म्हणतां-पण पुरुषांचं म्हणणं ठाऊक आहे कां तुम्हांला ? ते म्हणतात कीं, मुलीच मुलांच्या पाठीं लागतात.

**राधा**:—हो ऽ ! मुलीच मुलांच्या पाठीं लागतात म्हणे ! कोण्या शहाण्याचं मत ग हें वीणे ? अं ?

**वीणा**:—गेल्या गणेशोत्सवांत किनई, आमच्या वाडींतील कार्यक्रमांत एक दिवस त्या पोटवडेकराच्या नकला होत्या. अन् त्यानें कीर्तनकाराची फार सुंदर नक्कल केली. प्रारंभीं निरुपण करितांनां ब्रह्म व माया हीं कशीं एकमेकांत गुरफटलेलीं असतात तें सांगतांनां तो म्हणाला कीं, ( चुटक्या वाजवून) 'ब्रह्म तिथें माया, वृक्ष तिथें छाया, बुवा तिथें बाया, समजाऽऽव्या ! ( सर्वजणी हंसतात )

**राधा**:—( लगेच हंसू आंवरून ) हुं. ! असल्या विनोदी नकलेचा कसला आधार देतेस ग ! मी म्हटलं, कीं खरंच कोणा विद्वानाचं तसं मत आहे कीं काय !

**लीला**:—पण आई, किती गमतीचं वाटलं ग तें ! ए वीणाताई, आणखी कसल्या नकला केल्या ग त्यानें ?

**वीणा**:—आणखी विशेष अशा कांहीं नव्हत्या. पण ह्याच कीर्तनकाराच्या नकलेंत पुढें आख्यान सांगतांना त्यानें भारीच मजा केली.

**लीलाः**—सांग ना ती आम्हांला. तुझ्या लक्षांत असेलच.

**वीणा**:—आहे साधारणशी लक्षांत. ऐक हं. त्या नकलाकारानें किनई, सीताहरणाचं आख्यान लावलं नि मूळ सीताहरणाची घटना बाजूलाच ठेऊन त्यानें शूर्पणखेवरच सारा भर दिला.

**लीलाः**—शूर्पणखा म्हणजे रावणाची बहीण ना? अन् त्यानेंच तिला धाडली ना रामाकडे?

**वीणाः**—हो अन् ह्या घटनेबद्दल सांगतांना तो नकलाकार म्हणाला, (उंच, स्पष्ट आवाजांत) जेहेत्ते कालाचे ठायीं, पंचवटींतील पर्णकुटींत रामचंद्र आणि सीतामाई गप्पागोष्टी करीत बसल्या असतांना उत्तम वस्त्रालंकारांनीं नटलेली शूर्पणखा तिथें प्राप्त झाली आहे! अन् आपल्या आतिथ्यशील वृत्तीला अनुसरून रामचंद्रांनीं तिला प्रश्न केला कीं, ' बाई ग, तूं कोण, कोणाला भेटायला आलीस?' तेव्हां एक मुरका मारून शूर्पणखा विचारती झाली, 'कुणाला भेटायला आलें? इश्श! तें कसं बाई सांगू?' नांव तिकडचं घेउं ग कसं बाई, नांव तिकडचं घेऊं ' (गाते) (सर्वजणी हंसतात.)

**वीणाः**—त्यावर सीतामाई बोलल्या कीं, 'हें असलं काय कामाचं! तूं सरळ नांव सांग. त्यावर आणखी एक मुरका मारून शूर्पणखा म्हणाली, ' कौसल्येचा राम, बाई, कौसल्येचा राम!' तें ऐकून अत्यंत शुद्ध हेतूनें रामचंद्रांनीं विचारलं, 'मग बोल तर काय काम आहे तुझं माझ्याकडे?' 'म्हंजे!' तिसरा मुरका मारीत शूर्पणखा बोलली, 'माझा संदेश नाहीं मिळाला तुम्हांला? काल मीं त्या पांखराला सांगितलं कीं, ' जा घेऊनि संदेश पांखरा, जा घेऊन संदेश' एक आवंढा गिळून रामचंद्र विचारते झाले, ' कसला संदेश हा बाई! माझ्या नाहीं ध्यानांत येत. ' तेव्हां शूर्पणखा त्वरेनें म्हणाली, 'काय सांगू! 'गेलें तुझ्यावर जडुन रामा मन। गेलें तुझ्यावर जडुन।' म्हणून म्हणते कीं, आतां आपण दोघं ' आंबेवनांत जाउं या दूर। रानारानांत सजणा ' हें ऐकून रामचंद्र स्तंभित होऊन तिच्याकडे पहातच राहिले. व म्हणून शूर्पणखा मुरकत म्हणाली, 'हें काय बरं? ' नका गडे, माझ्याकडे पुन्हां पुन्हां पाहूं। लाजरिच्या रोपटिला दृष्ट नका लाऊं!, बिचारे रामचंद्र लज्जित होऊन खालीं मान घालून बसले. तें पहातांच ती मायाविनी शूर्पणखा रुसून म्हणाली, ' नाहीं मीं बोलत आतां नाहीं मीं बोलत। विनयवती मीं कांता। नाहीं मीं बोलत।' पण तरीहि रामचंद्रांनीं तिजकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं व म्हणून ती पुनः मोठ्या

आर्जवानें म्हणाली, ' बोल सख्या. मधुबोल रे धरूं नको अबोला। बोल सख्या मधु बोल ' आतां मात्र सीतेचा शांतपणा ढळला. ती म्हणाली, तूं कोण आहेस अन् कुठून आली आहेस तें स्पष्ट सांग! व ती रावणाची भगिनी आहे असं कळतांच सीता रामचंद्राला त्यावेळीं सांगती झाली कीं, ' नाथ, दूती नसे ही बाला, सवतचि भासे मला!' प्रिय पत्नीचे हे शब्द ऐकून रामचंद्राला फार खेद झाला व त्यांनीं शूर्पणखेला जाण्यास सांगितलें. पण शूर्पणखा म्हणाली रामचंद्रा मग 'शांत सागरीं कशास उठाविलीस वादळें? ' पण राम तिच्याकडे सपशेल पाठ फिरवून बसले. व म्हणून एक लांबलचक निःश्वास सोडून शूर्पणखा म्हणाली, ' हाय! अंतरीच्या अपुऱ्या आशा आकारुनि कधीं येतिल कां रे येतिल कां?,—काय? कसा वाटला हा मासला?

**लीलाः**—( हंसत ) फारच छान! वीणाताई, पुनः त्याच्या नकला झाल्या तर मला सांग हं ग. मीं अवश्य येईन. आई जाऊं ना मीं?

**राधाः**—हंऽजा! तुम्हां पोरींनां देवादिकांची चेष्टा जर रुचतेय् तर जा बापड्या!

**रमाः**—असं नाहीं हो राधाबाई! ह्या वयांतच हंसाखेळायचं ना त्यांनीं! मग असली मौज त्यांना आवडणारच! वीणाताई, मलासुद्धां गंमत वाटली हं. खरं सांगा राधाबाई, तुम्हांलाहि नाहीं कां गंमत वाटली!

**राधाः**—वाटली थोडी. पण ही वीणा किनई, पहिल्यापासूनच भारी चेष्टेखोर! नकला काय करील, विनोदी चुटके काय सांगील–त्यामुळें नबुताईची भारी लाडकी आहे ती! नबुताईचा स्वभावहि पडला चेष्टेखोर. त्यामुळें ही सांगणारी नि ती ऐकणारी. जोडी छान जमते त्यांची!

**लीलाः**—आई ग, नबुमावशी ह्या वीणाताईसारखच्चि चेष्टेखोर आहे. नि मग तुला कशी ग चेष्टा विनोदाची फारशी आवड नाहीं!

**राधाः**—हंऽ! मला चेष्टाविनोदाची आवड नाहीं? लीले, तुला कल्पना नाहीं पोरी. लहानपणीं मीं फार हंसरी, बोलकी नि चेष्टेखोर होते. पण आतां कांऽहीं राहिलं नाहीं त्यांतलं! हंऽ! कापराचा वास खरं म्हणजे, कित्ती उग्र असतो! पण तो उघड्यावर पडला कीं सारा वास उडून जातो पार! तसंच आहे हें!

**वीणाः**—काकू, निर्जीव कापराच्या वडीला आपला वास राखतां येत नसेल पण चालत्या, बोलत्या माणसांनां आपला जन्मस्थ गुण राखतां यायला हवा!

**राधाः**—बोलणं सोपं आहे वीणे! आतां बघूं या तूं आपला जन्मस्थ गुण कितपत राखतेस तें! तुला किनई, तुझ्यासारखाच विनोदी नवरा मिळाला तर ठीक!

**वीणाः**—( चेष्टेनें ) त्या पोटवडेकराचं लग्न झालंय् हं काकू.

**मंगलाः**—( नाराज स्वरांत ) शीः ! वीणे काय ही भलतीच मस्करी ग ! तुझ्या जिभेला थोडं तरी हाड आहे कां !

**वीणाः**—हें ग काय असं मंगले ! अगदीं निष्पाप मस्करी केली मी अन् तरीसुद्धां ती भ्रष्टाकाराच्या सदरांत समजायची ! मग मी आपली माझी चेष्टा मागें घेते हं- होऽ बाई ! तुला जर त्यामुळें इतका धक्का बसला तर ( राधाबाईकडे हात करून ) ह्यांनां केवढा धक्का बसेल !

**राधाः**—अन् आमचं एक असूं दे मेलं ! पण उद्यां तुझं लग्न झालं नि तुझ्या नवऱ्याला जर विनोदाचं वावडं असलं, तो जर गंभीर नि अबोल वृत्तीचा असेल तर ग कसं व्हायचं ! तुझा हा अखंड विनोद कांहीं त्याला पचायचा नाहीं. त्याला नक्की अजीर्ण होईल ! बरं, असा विनोद करितां आला नाहीं तर तुला तें रुचायचं नाहीं नि मग तुझी उपासमार होईल !

**वीणाः**—( खिलाडूपणानें हंसत ) अंहं ! काकू, ती काळजी नको ! संसार म्हणजे प्रारंभापासून शेवटपर्यंत देवाण घेवाणाचा व्यवहार असतो हें सतत ध्यानांत ठेवलं नि आपल्या वागण्या, बोलण्यांत, सुवर्णमध्य साधला कीं अजीर्णाचीहि भीति नको नि उपासमारीचीहि चिंता नको !

**रमाः**—अगदीं लाख बोललीस हो तूं वीणाताई ! पुष्कळ तथ्य आहे बाई, तुझ्या बोलण्यांत !

**वीणाः**—असणारच ! परीक्षेला बसण्यापूर्वी साऱ्या विषयांची जशी जय्यत तयारी करावी लागते तशी लग्न करण्यापूर्वी हल्लींच्या प्रौढ मुलींनां लोकांच्या वैवाहिक जीवनाचा आगाऊ अभ्यास जय्यत करावा लागतो.

**रमाः**—हो, म्हणतातच ना कीं, पुढच्यास ठेंच अन् मागचा शहाणा !

**वीणाः**—होय, कांहीं अयशस्वी विवाहांच्या बाबतींत हें खरं आहे. पण यशस्वी विवाहांच्या बाबतींत थोडी वेगळी म्हण तयार करावी लागेल ! ' पुढच्याचं धोरण तें मागच्यांचं कारण ' अशी नवी म्हण मला अधिक योग्य वाटते ! दुसऱ्यांचं वागण्याचं धोरण जर यशस्वी आपल्याला दिसलं तर त्याच धोरणानें आपण वागल्यास तें आपल्याला खात्रीनें तारक होईल, सुखकर होईल !

**राधाः**—अग्गबाई ! लग्नाबाबत बराच दूरवर विचार करून ठेवला आहेस कीं तूं वीणे ! शिजतंय वाटतं कांहींतरी !

**वीणाः**—उंहुं ! अजुनि कांऽहीं नाहीं ! पण तहान लागल्यावर विहीर खणणं

जितकं चुकीचं तितकंच असला विचार लग्नानंतर डोक्यांत आणणंहि चुकीचं ! आपल्याला जर लग्न करायचंय् तर तें शक्य तितकं सुखाचं व्हावं अशी योग्य काळजी आपण घ्यायलाच हवी, नाहीं कां ! बरं, जातें मी आतां. पुष्कळ वेळ झाला. मग काय मंगले, येणार कां फिरायला ?

**मंगला**:--उंहुं. नको बाई आज. पुन्हां केव्हां तरी पाहूं. पण जातेसच तूं ? आई, मी हिला बस स्टॉप पर्यंत सोबत जाते हं, चल वीणे.

**राधा**:—(घसा खांकरून) लीले, तूंहि जा कीं ताईबरोबर, बस स्टॉपपास्नं ती एकटीच घरीं येणार.

**लीला**:—ताई, येऊं मी ?

**मंगला**:—हो. ये कीं.

**वीणा**:—अग, खुश्शाल ये. तुला कळूं नये असं कांहीं खासगी थोडंच बोलायचंय् आम्हांला ? चल तूं. बरं, येतें हं. (तिघींहि जातात.)

**रमा**:—फार गोड मुलगी आहे हं ही वीणा ! आवडली मला !

**राधा**:—वा:! मग सून करून घ्या ना. श्रीकांताचा नि तिचा जोडाहि बरा दिसेल !

**रमा**:–(क्षणभर स्तिमित होऊन पहातात व मग हंसून) वीणा आवडलीय खरी मला पण ती मुलगी म्हणून आवडलीय. सून म्हणून नव्हे ! सून म्हणून मला आवडेल .........

**राधा**:–(घाईनें उठत) काय तरी माझं मेलं लक्ष्य ? वीणेला पेढा द्यायलाच विसरलें. आठवणीसरशीं आतांच देतें हं तुम्हांला. (कपाटावरील रद्दीचा एक तुकडा आणून त्यांत चार पेढे बांधून रमाकाकूंनां देतात.)

**रमा**:–किती पगार मिळतोय्-हो मंगलेला ?

**राधा**:–एकशेंवीस रुपये. बाकी तुम्हांला कांहीं त्याची मोठीशी अपूर्वाई वाटायची नाहीं. कारण तुमच्या घरीं तात्यांना अडीचशें रुपये पगार–नि श्रीकांताला दोनशें ! नि घरांत माणसं इन मिन तीन ! तुमचं आपलं सारं ठीक आहे ! अन् त्यामुळें तुम्हांला आमच्या ओढाताणीची कल्पनाच येऊं शकत नाहीं !

**रमा**:–असेल बाई तसं ! पण मुलीला नोकरी करायला लावणं म्हणजे अंमळ कसंसंच वाटतं !

**राधा**:–तें कशानें ? आजकाल चहूंकडे असंच चाललंयू ! आमचा रामू

सारा चवदा वर्षांचा ! यंदा सहावींत गेलाय्. पुढल्या वर्षी तो मॅट्रिक झाला, म्हणजे नोकरीला लागणार. पण तोंवर कसं भागवायचं ? अं ? अन् ही मंगला मुलगा असती तर नसती कां तिनें नोकरी केली ?

**रमाः**–तें रास्तच झालं असतं हो ! अन् मिळवत्या मुलाच्या नोकरीची त्याचं लग्न जमायला मदतच होते ! पण मिळवत्या मुलीची नोकरी बरीक तिच्या लग्नाच्या आड येते !

**राधाः**–होऽ ! जिला लग्न करायचं असेल तिच्या लग्नाच्या आड येत असेल कदाचित्, तिची नोकरी !– पण आमच्या मंगलेला–( मंगला व लीला येतात. )

**लीलाः**–आई ग, आम्हीं खालीं जातों तोंच बस् येतांनां दिसली. मग वीणाताईनें धांवत जाऊन ती पकडली. अन् आम्हीं दोघी परत आलों.

**राधाः**–(आंत जाणाऱ्या मंगलेला) मंगले, अशी इकडे ये बरं बाळ. (लीलेला) लीले, तूं जरा आमटीसाठीं डाळ शिजत लाव नि चार तोंडलीं चिरायची आहेत तेवढीं चिर. (लीला जाते) हं ! मंगले, ऐकलंस कां, आपल्या ह्या रमाकाकूंनां किनई, असं वाटतंय् कीं तुझ्या इच्छेविरुद्ध आम्हीं तुला नोकरी करायला लावतोय्. तेव्हां खरं काय तें सांग बरं त्यांना. ये, बैस इकडे. (तिला आपल्या दोघींमध्यें बसवून) सांग आतां. भिऊं नकोस हो बाळ

**रमाः**–मंगले, तूं आपल्या आवडीनेंच नोकरी करते आहेस होय ग ? तुला लग्न करायची इच्छा नाहीं ?

(मंगला एकदां आईकडे व एकदां रमाकाकूंकडे पहाते)

**राधाः**—बोल ना पोरी ! आमच्या परिस्थितीच्या मानानें आजवर तळहाताच्या फोडासारखी आम्हीं तुला वागवली. नि आतां आमच्या स्वार्थासाठीं नोकरी करण्याची आम्हीं तुझ्यावर बळजबरी करूं काय ? आपल्या माणसांनां मदत व्हावी म्हणून तूंच आवडीनें नोकरी करायला लागलीस ना ? सांग बाई एकदां काय तें ! आम्हांला काय शेरा देतेस तो ऐकूं दे तुझ्या तोंडून. सांग- तुला नोकरी करायला नको आहे काय !

( मंगला एक आवंढा गिळून आईकडे नुसतं पहाते. )

**रमा**–सांग ना ग, मंगले. आई कांहीं रागवायची नाहीं हो तुला. (मंगला त्यांच्याकडे पहाते.)

**राधाः**—इश्श, रागावणार कशाला बाई ? माझी सावत्र मुलगी कां आहे ती ! सांग ग, मंगले, ह्या रमाकाकू म्हणतात त्याप्रमाणें तुला नोकरी नको आहे

काय ? लग्न करायचय् कां तुला !

( मंगला क्षणभर टक लावून आईकडे पहाते व अंग शिराशिरल्यासारखें करून उठून उभी रहाते. )

**मंगला**:—(उंच स्वरांत) नाहीं. मला लग्न करायचं नाहीं ! नाहीं-नाहीं —नाहीं ? (असें बोलून आंत धांवत जाते.)

(राधाबाई व रमाकाकू तिच्याकडे वळून पहातात.)

(पडदा पडतो.)

[ पहिला अंक समाप्त ]

---

# अंक २ रा

**वेळः**—पहिल्या अंकानंतर एका वर्षानें - शनिवारची दुपार - घड्याळांत तीन वाजले आहेत.

**स्थळः**—तेंच - पण वधूपरीक्षेच्या समारंभासाठीं चांगल्या कोचखुर्च्या लोकांकडून मागून आणल्या आहेत.

(राधाबाई आपल्या स्वभावानुसार तुरुतुरु चालत ठेवरेव करीत आहेत)

**राधाः**—सारंच मुसळ केरांत ! अग लीले, विमलीनें रमाकाकूंकडून पेलेबशा आणल्या कां ?

**लीलाः**—(आंतून) नाहीं ग. त्यांचा हात रिकामा नव्हता म्हणे ! म्हणून त्यांनीं सांगितलं कीं, आपणच अंमळशानें पोंचत्या करते.

**राधाः**—( किंचित् हळू ) त्याच येणार आतां इथें ! हुं ! तेंच तर नको होतं मला ! (मोठ्यांदा) अग, पण त्यांनां कशाला उगीच त्रास द्यायचा ? विमलेनें पुनः खेप घातली नाहीं ?

**लीलाः**—(आंतून) पण आज शनिवार असला तरी तिची नेहमींसारखी साडे-अकराचीच शाळा होती ना ? त्यामुळें तिला लगेच शाळेंत जायचं होतं.

**राधाः**—म्हणजे आतां त्याच-(रमाकाकू कपबशा भरलेली पिशवी घेऊन येतात.) या, रमाकाकू, तुम्हांला विनाकारण हेलपाटा पडला हं.

**रमाः**—इश्श ! त्यांत काय मोठंसं हो ! हं, हे घ्या पेलेबशी. (राधाबाई ते बाजूच्या टेबलावर ठेवतात) आज गडबड कसली हो राधाबाई ? अन् हें फर्निचर कुठलं ?

**राधाः**—आमच्या मालकीणबाईकडून आणलं. पेलेबशी उसने द्यायला त्या तयार नसतात. म्हणून म्हटलं, ते तुमच्याकडून आणावे.

**रमाः**—पण ही तयारी कसली चाललीय ?

**राधाः**—आज वधूपरीक्षा आहे हो आमच्या घरीं.

**रमाः**—(दचकतात) वधूपरीक्षा ? अन् ती कुणाची ?

**राधाः**—लीलेची आमच्या.

**रमाः**—लीलेऽचीऽ ? हंऽ ! पण म्हणजे मंगलेला ठेऊन लीलीचं लग्न आधीं करणार तुम्हीं ?

**राधा :**—मग काय करणार हो ? लग्नच करायचं नाहीं असं म्हणतेय ना मंगला ! अन् तिला नोकरीला लागून वर्ष झालं ! आतां टेंपरवारी नाहीं

कांहीं ती. कायम झालीय् बरं. अन् भरींत भर म्हणजे गेल्या महिन्यापासून तिला दहा रुपये बढती मिळालीय्! आतां कुठली हो ती लग्न करणाराय! अन् ऐकलंत कां रमाकाकू, तिचं हपीस भाऽरी चांगलं आहे हो! तिच्या पगारांतनं दरमहा बारावा हिस्सा–म्हणजे दहा रुपये कापून घेतात नि वर्षाअखेर हपीस म्हणे तितकेच पैसे आपण घालतं! इकडून सांगणं झालं कीं, चार वर्षांत एक हज्जार रुपये फंड जमणार हो तिचा!

**रमाः**—हंऽ! अन् ह्याच हिशेबानें पाह्यलं तर वीस वर्षांत पांऽच हजार जमेल. पण तोंवर मंगलेची चाळिशी उलटून जाईल!

**राधाः**—होय हो! तेंच कसंतरी वाटतंय् मला! पण काय करणार? मिळवती मुलगी ती! तिला आम्हीं काय बाई सांगणार, शिकवणार?

**रमाः**—राधाबाई, मीं स्पष्ट बोलतें म्हणून रागावूं नका हं. पण मिळवत्या मुलीचं लग्नकार्य न करितां तिला मिळवती म्हातारी करण्याचं तुम्हीं–तिच्या आईबापांनींच ठरवल्यावर ती बापडी काय करणार?

(राधाबाईचा चेहरा जरा गोरामोरा होतो. त्या पदरानें तोंड पुसतात–उगीचच वारा घेतात. व मग बळेंच हंसतात.)

**राधाः**—(हंसून) म्हंजे? अजुनि तुम्हांला असंच वाटतयं? वाटो बापडं! अहो, गेल्या वर्षी–मंगलेला नुक्ती नोकरी लागली होती त्याचवेळीं तिनें तुम्हांला स्पष्ट सांगितलं कीं, आपल्याला लग्न करायचं नाहीं! पण तुम्हीं तें लक्षांतच घेत नाहींत. मग काय करणार?

**रमाः**—वाः वाः! असं काय बरं उगीचच वेड घेऊन पेडगांवाला जातां? मंगलेनें तसं सांगितलं खरं, पण ते नुस्ते ओंठापासून आलेले शब्द होते. पोटापासून नव्हते बरं ते निघालेले!

**राधाः**—म्हंजे! माझी मंगला खोटं बोलली असं कां वाटतंय् तुम्हांला? हीच कां तुम्हीं तिची परीक्षा केलीत?

**रमाः**—तिची परीक्षा करायची तीच केलीय् मीं नि म्हणूनच तर पुनः पुनः तुम्हांला नको असलेला विषय काढतेय् मीं.

**राधाः**—अं–हं–होऽ! पण म्हटलं तुम्हांला बसायला वेळ आहे कां? कीं घरीं काम आहे?

**रमाः**—काम तें कसलं मेलं? तीन माणसांचंच तर सारं!

**राधाः**—तुम्हीं किनई, आतां सून आणा बाई, हाताखालीं. पंचावन्नाव्या वर्षी

पुरुष पेणपण घेतात तसं पन्नाशीच्या घरांत आल्यावर सून आणून आपण बायकांनीं पेणपण घ्यायला हवं ! तर काय ?

**रमा**ः—पण सासूला पेन्शन देण्यासारखी सुशील सून मिळाली तर ठीक ! नाहींतर त्या सुनेची उस्तवारी करण्यांत त्या सासूला नको जन्म व्हायचं ! बाकी, ओळखींतली मुलगी केली तर असलं भय नसतं हो !

**राधा**ः—अहो, म्हणूनच तर तुम्हांला आमची वीणा सुचविली होती मीं ! पण तुम्हीं तें मनावरच घेतलं नाहीं ! अन् आतां दोन महिन्यांपूर्वी तिचं लग्नहि झालं !

**रमा**ः—मग होईना कां ! मला सून म्हणून पसंत नव्हतीच ती ! मला किनई—

**राधा**ः—अन् कळलं कां रमाकाकू, त्या वीणेनें एका गिरणबाबूबरोबर लग्न केलंय.

**रमा**ः—गिरणबाबूबरोबर ? म्हणजे ? आपल्या जातीचा नाहीं तो ?

**राधा**ः—जातीचा आहे हो. पण गिरणींत नोकरी आहे त्याला कुठल्याशा. अन् सारा दीडशें कीं पावणेदोनशें पगार आहे म्हणे ! वीणेच्या वडिलांनां पसंत नव्हता हो हा जांवई ! पण काय करणार ? त्याच्यावर आपलं प्रेम जडलंय् म्हणून हट्टूनच बसली ना वीणा ! नि नबुताईनेंसुद्धां तिचाच पक्ष उचलून धरला नि शेवटी तें लग्न झालं !

**रमा**ः—पण वीणा सुखांत आहे ना ?

**राधा**ः—आहे असं म्हणतात ! खरं, खोटं कुणाला ठाऊक ?

**रमा**ः—राधाबाई, त्या मुलीचा संसार पूर्ण सुखाचाच होणार आहे अशी खात्री आहे माझी ! हें बघा, शिकलेला गायक जसा योग्य ठिकाणीं कोमल, तीव्र स्वर लावून गाणं सुरेल म्हणतो तशी वीणा योग्य वेळीं नमतं, चढतं घेऊन आपला संसार उत्तम यशस्वी करील !

**राधा**ः—करूं दे ग बाई ! तिनें इतका तिरातिरेपणा केल्यासारखा सगळा आनंदी आनंद झाला कीं मिळवलं ! अन् खरंच, रमाकाकू, तुमची भाची आहे ना हो लग्नाची. मग तिलाच कां करून घेत नाहीं तुम्हीं आपल्या श्रीकांताला ?

**रमा**ः—होऽ ! सुमी माझी सख्खी भाची ! पण राधाबाई, तिचा स्वभाव किनई, आपल्या आईसारखा आढ्यतेखोर आहे थोडा ! आई आपल्या श्रीमंत माहेराची नि लेक आपल्या श्रीमंत आजोळाची सारखी प्रौढी गातात. तसलं नाकापेक्षां जड मोती हो, काय कामाचं ? अन् राधाबाई, हें बघा,

आपल्या इकडे मुलाच्या आईनें मुलीसाठीं शब्द टाकण्याचा प्रघात नाहीं. पण तरीसुद्धां श्रीकांताच्या नि मंगलेच्या सुखासाठीं कळूनसंवरून तो कमीपणा मीं पत्करतें. राधाबाई, मला तुमची मंगला सून म्हणून फार पसंत आहे. म्हणून म्हणतें, आतां पुरे झाली मंगलेची नोकरी !

**राधाः**—सांगणं सोपं आहे, रमाकाकू ! आमचा रामू आत्तां म्याट्रिकच्या वर्गात गेलाय्. नि आणखी चारच महिन्यानीं इकडून पेणपणीत निघायचं होणार ! मग पेणपणीच्या साठ रुपयांत कसं भागणार आमचं ?

**रमाः**—हंऽ ! मग संपलंच म्हणायचं ! कारण मंगला आपण होऊन हें नौकरीचं जूं कधींच झुगारूं शकणार नाहीं ! खरंच, मला मोठं आश्चर्य वाटतं कीं, मंगलेसारख्या सौम्य मुलीची वीणेसारख्या जहाल मुलीशीं कशी एवढी मैत्री जुळली. ?

**राधाः**-होय बाई ! मलासुद्धां कधीं कधीं त्यांच्या ह्या मैत्रीमुळे अंमळ भय वाटे ! होऽ कायसं म्हणतात ना ? 'ढवळ्यामंगें पवळा बांधला नि वाण नाहीं पण गुण लागला' तशी गत व्हायची, म्हटलं ! आमच्या मंगलेच्या सहवासानें वीणा तिच्यासारखी समजूतदार होण्याऐवजीं मंगलाच त्या वीणेसारखी बंडखोर हे ते कीं काय ? पण नाहीं ! निभावलं बाई !

**रमाः**—पण राधाबाई, आजकालच्या ह्या स्वतंत्र भारतांत मुलींनीं थोडा बंडखोरपणा नको कां दाखवायला ?

**राधाः**—हुंऽ ! 'अनुभवाशिवाय कळत नाहीं नि चावल्याशिवाय गिळत नाहीं' बरं, रमाकाकू ! देवानें तुम्हांला मुलगी दिली नाहीं म्हणून बरं ! नाहींतर ती सवाई वीणा निघाली असती !

(एवढ्यांत मंगला ऑफिसांतून येते व रमाकाकूंनां पाहून बावरी-बावरी होते)

**रमाः**—(प्रेमानें) मंगले, ये ना बाळ. बस इथें. कित्ती दिवसानीं नजरेला पडलीस ही माझ्या. वाळलीस ग तूं पोरी !

**मंगलाः**—छे ! बऱ्याच दिवसांनीं पाहिल्यामुळें वाटतंय् तसं तुम्हांला काकू ! केव्हांशा आलांत तुम्हीं ? (राधाबाईची चुळबुळ चालू असते)

**रमाः**—इतक्यांतच आलेय् मी ! आज किनई, श्रीकांताच्या हपीसची क्रिकेट म्याच आहे. अन् तो कप्तान आहे त्याच्या हपीसच्या टीमचा ! तेव्हां म्याच खेळून संध्याकाळीं दमून घरीं येणार तो ! नि म्हणून जेवण

आटोपतांच, लोण्याचं मोहन घालून त्याच्या आवडीच्या थोड्या चकल्या केल्या नि ते पेलेबशी घेऊन आलें मी इकडे. (मंगला आतुरतेनें एकत असते.)

**राधाः**—मंगले, चल बाई, हाततोंड धू. पातळ बदल.

**मंगलाः**—( उगीचच हंसत ) मीं कशाला पातळ बदलायला हवंय् ? माझी नाही कांही वधूपरीक्षा–

**राधा०:**—( तोंडभर हंसत ) तुला लग्नच करायचं नाहीं तर वधूपरीक्षा कोण करणार बाई, तुझी ? बरं, लीला व्यवस्थित तयार झालीय् काय तें तरी बघ जा.

**मंगलाः**—इथेंच हांक मारतें कीं तिला. लीले, ए ऽ लीलु, बाहेर ये ना. अग, तुझ्या सासुबाई आल्या नाहींत् म्हटलं अजुनि !

**रमाः**–काय ग मंगले, आतां कोण येणाराय् लीलेला पहायला ?

**मंगलाः**—त्या शारदाबाई देशपांडे येणार आहेत. त्यांचा तो सुरेश म्हणून नी. कॉम् झालेला मुलगा आहे ना ! त्याच्यासाठीं खटपट करतोयू आम्हीं.

**रमाः**—अस्सं ! चांगलं आहे हो तें स्थळ ! पण–शारदाबाईंची हुंड्याची उडी जरा मोटी आहे म्हणे !

**मंगलाः**—असं म्हणतात बाई ! नि म्हणूनच त्यांनां शह देण्यासाठीं आतां वीणा येणाराय् इकडे.

**राधाः**—वीणा ? अन् ती कुठें भेटली ग तुला ?

**मंगलाः**—अग तुला सांगायला विसरलेंच मीं. कालपासून वीणा आमच्या ऑफिसांत यायला लागलीय्

**राधा०:**—( समाधानानें ) म्हंजे ? तीसुद्धां नौकरी करूं लागली ?

**मंगलाः**—होय ना. तिच्या नवऱ्याला पगार साधारणच मिळतो. म्हणून ती नौकरी करून संसाराला हातभार लावतेय्.

**राधाः**—होय ना ? ( विजयानें ) पाहिलंत ना रमाकाकू, आजकाल मुली नौकऱ्या करून संसाराला मदत करतांनां चहूंकडे दिसतात बरं !

**रमा०:**—हो. नवरा, बायको ही संसाररथाचीं दोन चाकं असतात ना ? त्यामुळें संसाराचा गाडा सरळ चालण्यासाटीं बायकोनें नवऱ्याला अशी मदत करणं योग्यच आहे !

**राधा:**—अन् मुलीनें आईबापांनां अशी मदत करणं अयोग्य आहे होय ?

**रमा०:**—छेः छेः ! अयोग्य नव्हे कांहीं ! मुलीचं कर्तव्यच आहें तें !

**राधा.:**--आतां कसं बोललांत !

**रमा:**—पण इतकंच कीं, आईबापांनीं मुलीकडून ह्या कर्तव्याची बजावणी थोडे दिवसच करून घेणं हें त्यांचं कर्तव्य आहे ! ऊंस गोड लागला म्हणून मुळासकट कां कोणी खातात ?

**राधा:**—पण आपल्याला मुळासकट खाऊं द्यावं कीं नाहीं हें आजकालच्या ऊंसांनां नीट कळतं बरं! चांऽगले शिकलेले हुष्पार असतात तुमचे हे ऊंस ! (रागानें पदर जोरानें ओढून घेतात. व जरा इकडे, तिकडे पाहून रागानें लीलेला हांका मारतात.) लीले, झाली कीं नाहीं अजुनि तुझी तयारी ?

(लीला उजव्या हातानें केंसांत फुलं खोंचत बाजूच्या खोलींतून धांवत येते.)

**लीला:**--झाली ग आई! वेणीचं चाक बांधून त्यांत फुलं माळीत होते.

**राधा:**—हंऽ! अशी पुढें ये बघूं. (तिला नीट न्याहाळीत) काय ग, कुंकु अंमळ मोठं नको कां ?

**लीला:**—मध्यम आकाराचंच आहे हें आई.

**रमा:**--बाई, बाई! इतकी विचक्षणाशी चाललींय् हो लीलीच्या कुंकवाची ?

**राधा.:**--मग काय करणार हो? गेल्या महिन्यांत त्या सुभद्राबाई शेंडे पहायला आल्या होत्या. नि हिचं कुंकु फार बारीक आहे अशी खोड काढली त्यांनी.

**रमा:**—अन् तेवढ्यासाठी लग्न मोडलं ?

**मंगला:**—नाहीं. तेवढ्यासाठीं नाहीं मोडलं. पण ही तकलुपी सबब सांगितली त्यांनीं. खरं म्हणजे, हुंड्याचा आंकडा पांचशांनीं वाढला असता तर लहान कुंकु नक्की माफ झालं असतं !

**राधा.:**—अन् बरं कां रमाकाकू, तेव्हांपासून ह्या लीलीसाठीं मीं आपले तीन तऱ्हेचे पोषाक ठरवूनच टाकले. अगदीं जुनीं माणसं पहायला येणार असलीं तर नऊवारी लुगडं, केंसांचा अंबाडा, त्यावर फुलांची वेणी, कानांत मोत्यांच्या कुड्या नि ठळकसं कुंकु ! अन् नव्या फ्याशणचीं माणसं येणार असलीं तर पांच वारी, बिनकांठ पदराचं पातळ, पाटीवर वेणीचा शेंपटा, कानांत एवढाले डूल नि कुंकवाची बाऽरीक टिकली ! अन् आज त्या शारदाबाई येणार आहेत तशी जुनीहि नाहींत नि नवीहि नाहींत अशीं माणसं येणार असलीं तर हा अस्सा पोषाक! कांठपदराचं पांचवारी पात्तळ, वेणीचं चाक नि त्यावर दोनच फुलं, कानांत हीं कर्णफुलं नक्षीचीं अन् कुंकु मध्यम !

**रमा:**—वाः राधाबाई, बराच अभ्यास केलाहेत कीं तुम्हीं ह्या शास्त्राचा !

**राधा**:—अहो, तरच लग्नाच्या परीक्षेंत मुलीचा वरती नंबर लागायचा! तुम्हांला मुलगी नाहीं म्हणून तुम्हांला ह्याची कल्पना नीटशी येणार नाहीं!

**रमा**:—तें खरं! पण माझ्या श्रीकांतासाठीं मुलगी पहातांना (मंगला दचकून त्यांच्याकडे पहाते. दृष्टादृष्ट होतांच रमाकाकू आश्वासनपूर्वक हंसतात.) मीं किनई, मुलीबद्दल कसली म्हटल्या कसली विचक्षणा करणार नाहीं! मुलीची पसंति सर्वस्वीं श्रीकांतावर सोंपवीन मीं! जी मुलगी त्याला पसंत ती मलाहि पूर्ण पसंत!

(मंगला उत्सुकतेनें त्यांचे शब्द ऐकत असते. मग ती हलकेंच निःश्वास सोडते. पण रमाकाकू व लीला आपल्याकडे पहात आहेत हें तिच्या लक्षांत येतें.)

**मंगला**:—(बळेंच हंसून) वा! मालकीणबाईकडलं फर्निचर आणून आईनं ही खोली छानच सजवलीय् हो

(रमाकाकू तिच्याकडे पहातात व एक सुस्कारा सोडतात.)

**रमा०**:—बरं जातें मी राधाबाई.

**राधा**:—(हुश्श वाटून) निघालांत? बरं!

**रमा०**:—हो. तुमच्या घरीं गडबड आहे. येतें ग मुलींनो.

(रमाकाकू जातात. मंगला त्या गेल्या त्या दिशेकडे टक लावून पहाते व नंतर एक आवंढा गिळून स्वतःला सांवरते)

**मंगला**:—(उसन्या उल्हासानें) म्हटलं, लीलाताई, तुम्हीं आतां पडद्यांत चला बरं कां. आतां ह्या रंगभूमीवर वधूपरीक्षेचं नाटक होणाराय् अन्-वधूचा प्रवेश इतक्यांत नाहीं कांहीं! तेव्हां तुम्ही आंत पळा आतां.

(लीला गंभीर मुद्रेनें आंत जाण्यास वळते.)

**राधा**:—लीले, एवढ्या ह्या पेलेवशा स्वयंपाकघरांत ने जातांना.

(लीला आंत जाते.) (वीणा येते.)

**वीणा**:—वा! वधूपरीक्षेचा सीन् तर व्यवस्थित दिसतोय् हं—

**मंगला**:—होय ना? अन् तूंहि अगदीं वेळेवर आलीस हो.

**राधा**:—वीणे, आज मंगलेनें तुला म्हणे मुद्दाम इकडे बोलावलं! पण त्याचं कारण कांहीं मला नीटसं नाहीं बाई, कळलं!

**वीणा**:—आतां एकदम वेळेवरच कळेल तें, काकू! अगबाई! मंगले, आल्याच हं त्या.

(वीणा जरा अलीकडे होते व राधाबाई आणि मंगला सामोऱ्या जातात. शारदाबाई व कुसुम येतात)

**राधाः**—यावं, असं बसावं इथें.

(शारदाबाई कोंचावर बसतात तोंच त्यांना वीणा दिसते.)

**शारदाः**—(पटकन् उठून पुढें येत) कोण? वीणाताई! अन् तुम्हीं इकडे कुठें?

**वीणाः**—ह्यांच्याशीं नातं लागतं माझं.

**शारदा**:—होय? म्हणजे खारच्या जोशांशींसुद्धां नातं लागतं ह्यांचं?

(राधाबाईकडे बोट करतात.)

**वीणाः**—होय तर! विभादादाची आई ती ह्यांची सख्खी थोरली बहीण! विभादादा सख्खा भाचा ह्यांचा! ह्या मंगलेचा सख्खा मावसभाऊ!

**शारदा** : तुमचा चुलतभाऊ नि मंगलाताईचा मावसभाऊ? अस्सं!

**वीणाः**—होय ना. ह्या राधाकाकू तुमच्या कुसुमच्या सख्ख्या मावससासूबाई होणार बरं.

**राधाः**—म्हंजे? वीणे, विभाकराचं लग्न ठरलं हिच्याशीं?

**शारदाः**—आमची कुसुम किनई, पसंत पडलीय् त्या मंडळींना. पण देणं घेणं ठरायचंय् अजुनी! पण आपण विभाकररावांची सख्खी मावशी? वाः! अन् आपलं जाणं, येणं आहे तिथें?

**राधाः**—आहे तर! नबुताई–विभाकराची आई–सारखी बोलावतें मला आपल्याकडे, पण खारला तिच्याकडे जायचं, म्हणजे दूर पडतं ना अंमळ! अन् विभाकरासाठीं मुली पहाणं चालू आहे हें ठाऊक होतं मला, पण आपली मुलगी त्याला सांगून गेलीय् हें नव्हतं मला ठाऊक!

**शारदाः**—ह्या चार दिवसांतलीच तर ही गोष्ट!

**वीणाः**—अन् तुमची लीला ह्यांच्या मुलाला सांगून गेलीय् हें तरी कुठें त्यांना ठाऊक आहे?

**शारदाः**—बरं, पण आपण बसा ना इथें ह्या कोंचावर.

**राधाः**—छेः छेः आपण बसा तिथें.

**शारदाः**—उंहुं आपणच बसा.

(बळेंच राधाबाईंना कोंचावर मध्येंच बसवितात.)

**मंगलाः**—खरंच कीं! आई, तुला सांगायला विसरलेंच मी! त्या ऽ कुळकर्णी सावकारांची मुलगी सांगून जाणाराय् म्हणे विभादादाला.

शारदाः—कुळकर्णी सावकारांची ? हे कोण, कुठले हो ?

मंगलाः—हुंः ! मोठं वडं प्रकरण आहे तें ! कोल्हापुरकडचे आहेत ते. नि त्यांच्या घरांत पैसा कुजतोय् ! पण बाई, त्यांची मुलगी दिसायला तुमच्या ह्या कुसुम पुढें अगदींच टाकाऊ !

शारदाः—( आनंदानें ) होय ना ? पण मंगलाताई, तुम्ही कां उभ्या ? बसा ना इथें. अन् वीणाताई, तुम्हीहि बसा.

( दोघींना कोंचावर राधाबाईंच्या दोन अंगाला बसवतात )

शारदाः—( स्वतः खुर्चीवर बसत ) अग कुसुमे, नमस्कार कर ह्यांना. ( कुसुम नमस्कार करते व खुर्चीवर बसते ) हं ऽ ! ( राधाबाईंना ) ऐकलं कां, म्हटलं, हुंड्यावर जोर न देतां आमची कुसुम करून घ्या अशी आपण तिघींनीं गळ घालायला हवी जोशी मंडळींना—अन् विशेषतः आपल्या नबुताईंना. शिकली, सवरलेली हुपार म्हणून त्यांना ह्या वीणाताईंचं फार अगत्य वाटतं हें मला ठाऊकच आहे. अन् आपण तर त्यांची सख्खी बहीण ! तेव्हां कुसुम आपली मुलगी आहे असं समजून आपण शक्य ती खटपट करा. कोणसे ते कुळकर्णी सावकार मुलगी सांगून जाण्याच्या आंत आमचं जमवून टाका. आजच खारला जा आपण. म्हणावं, आम्ही मुलीच्या अंगावर थोडंफार वाळलेणं घालूं, झालंच तर सऽगळी हौस करूं नि निम्मा लग्नखर्च करूं. पण हजारांनीं हुंडा द्यायला नाहीं आम्हांला परवडणार ! बाकी खरं म्हणजे, आजकाल ह्या सुधारलेल्या काळांत हुंडा घेत नाहींतच बहुधा ! म्हटलं, ती मंडळी सुशिक्षित आहेत. तेव्हां त्यांचीं मतं हुंड्याच्या विरुद्धच असतील ! नाहीं कां ?

वीणाः—होऽ ! आमच्या काकांचीं मतं हुंड्याविरुद्ध आहेत. पण काकूंचं—ह्यांच्या नबुताईचं—मत( हळूंच राधाबाईंना गप्प बसण्यासाठीं डिंवचते ) बरीक हुंडा घेण्याकडे आहे ! पण ह्यांनीं ( राधाबाईकडे हात करून ) समजावून सांगितल्यावर काकू ह्यांचं नक्की ऐकतील ! अन् मघां त्या कुळकर्णी सावकरांची मुलगी विभादादाला सांगून जाणाराय् म्हणून ही मंगला म्हणाली ना, ती मुलगी बघूंसुद्धां नका असं ह्यांनीं सांगितलं तर तें देखील ऐकतील हो त्या !

मंगला :—तर काय ? उगीच मुली काय बघत सुटायचं ! मुली म्हणजे बाजारांतली भाजी आहे कीं काय ? आई, तूं अगदीं आग्रहानें सांग ग नबुमावशीला. म्हणावं, ही कुसुम चांगल्या घराण्यांतली, चांगल्या वळणाची आहे. दिसायलाहि बरी आहे ! हिलाच पसंत करा, म्हणावं.

**शारदा** :—( खूप होऊन ) खरंच, असंच सांगा हं त्यांना. अन् ऐकलंत कां मंगलाताई, आमच्या कुसुमला गायलाहि छान येतं हो. कुसुम, म्हण बरं तुझं तें गाणं. कृष्णा धांव ना ( राधाबाईंना ) म्हटलं, जुना क्रिष्णलीलेचा विषय नि आज कालची नाचती, उडती चाल. त्यामुळें मोठं गंमतीचं वाटतं तें गाणं ! म्हण तें.

**कुसुमः**—( गाते )

**कृष्णा धांव ना । कृष्णा पाव ना ।**
**दाढीवेणीची गांठ जरा सोड ना । सोड ना ॥ ध्रु० ॥**
**केंस दुखोनि फार । वाहे अश्रूंची धार ।**
**दाढी हालतांना । वेणी ओढते ना ।**
**सख्या थांबा ना । नका हलूं केसांस लागे ओढ ना ॥१॥**
**फोड मडकीं सारीं । दूध लोणी चोरी ।**
**आतां माझ्यावरी । देवा, दया करी ।**
**गांठ सोड ना । हलक्या हातांनीं उकलुनि देना । ॥ २ ॥**

**मंगला व वीणाः**—( हंसून ) वाः ! गंमतीचं आहे खरं हें गाणं !

**शारदाः**—हो ऽ ! आणि हिला शिवणकाम, भरतकाम, सारं येतं हो ! अंगांतल्या ह्या पोलक्यावर तिनेंच केलीय हो ती एंबरायटरी कां काय म्हणतात तें !

**कुसुमः** इश्श ! आई, हा चिकन्चा पोल्का आहे. मीं नाहीं कांहीं एंब्रॉयडरी केलेली !

**शारदाः**—( जराहि खजील न होतां ) हो कां ? मला किनई हल्लीं कमी दिसतं हो ! बाकी, तूं केलेली एंबरायटरी विकतच्या तोडीचीच असते. अन् ऐकलं कां, आमच्या कुसुमला स्वयंपाकपाणीसुद्धां येतं हो सगळं ! अगदीं पोळी, पक्वान्नापर्यंत !

**मंगलाः**—अन् शिक्षण किती झालंय् हिचं ?

**शारदाः**—एम्. एफ्. आहे ती.

**मंगलाः**—एम्. एफ्. ? ही कुठली डिग्री ?

**शारदाः**—अहो, मॅट्रिकला नापास झालीय हो ! पण इकडून म्हणायचं असतं कीं, तसं सांगण्यापेक्षां एम्. एफ्. म्हणणं अधिक मोठेपणाचं वाटतं !

**मंगलाः**—( हंसू दाबीत ) वीणे, कळलं ना ? एम्. एफ्. म्हणजे मॅट्रिक फेल.

**राधाः**—( आतां धीर न धरवल्यामुळें ) म्हटलं, आमच्या लीलेला बोलावतें बाहेर.

( उठतात. )

**शारदा**:—( भानावर येत ) अं ? हो-होय-खरंच कीं ! बोलवा तिला बाहेर.

( वीणा व मंगला उठतात, व शारदाबाई कोंचावर बसतात. )

**राधा**:—लीले, चहा घेऊन ये बाळ बाहेर.

( मंगला आंत जाते व लाडवांची ताटली आणि चिवड्याची बशी घेऊन ती व तिच्या पाठून चहाच्या पेल्यांचें तबक घेऊन लीला येते. )

**शारदा**:—आज उकडतंय् नाहीं अंमळ ?

( राधाबाई कपाटावरून एक ताडपत्राचा जुना पंखा काढून आर्जवानें त्यांच्या हातीं देतात. )

**राधा**:—हं-आणलास चहा ? ठेव इथें. नि आधीं नमस्कार कर.

( लीला नमस्कार करते. व चहाचे पेले सर्वांना देते. मंगला लाडू, चिवडा पुढें करते. )

**शारदा**:—खायला नको बाई. आज आमचीं जेवणं किनई, भारीच उशीरां झालीं हो ! जेवलों नि कोरीं लुगडीं अंगावर ओढून इथें आलों म्हणा ना.

**राधा**:—पण तोंड गोड करायला थोडा लाडू घ्यावा.

**शारदा**:—चहानें तोंड गोड होणारच. पण तुम्हीं म्हणतांच तर घेऊं या थोडा लाडू.

( एक लाडू फोडून थोडा तुकडा कुसुमला देऊन थोडा आपण घेतात. )

**शारदा**:—वीणाताई, तुम्हीं घ्या ना...( वीणा त्यांतलाच तुकडा घेते. )

**शारदा**:—( लीलेला ) बैस तूं त्या खुर्चीवर कुसुमच्या शेजारीं ( लीला बसते. )

**मंगला**:—लाडवावर चहा प्यालं तर कडू नाहीं कां लागणार तो ? मध्यें चिवड्याचा एक घांस हवा, खरं म्हणजे ! ( चिवड्याची बशी पुढें करते. )

**शारदा**:—हें खोटं नाहीं हं. ( थोडा चिवडा घेतात. )

**मंगला**: तर हो ! माणसाला प्रत्येक गोष्टींत रुचिपालट पाहिजेच असतो !

**वीणा**:—पण मंगले, श्रीमंतांना त्यांच्या ऐश्वर्याच्या गोड रुचीचा नाहीं हं कधीं वीट येत ! त्या बाबतींत त्यांना रुचिपालट कधींच आवश्यक वाटत नसतो !

**मंगला**:—चुकतेस तूं वीणे ! श्रीमंतांनासुद्धां रुचिपालट हवासा वाटतो ! नि म्हणूनच आपल्या शरीराला नि मनाला अनेक काल्पनिक दुखणीं कायमचीं लावीत असतात ते ! ऐश्वर्याच्या गोड रुचीची तोंडाला मिठी बसूं नये म्हणून असलं खारट, तुरट आडखाणं मुद्दाम निर्माण करतात ते ! सुख आपल्याला खुपतंय् असं भासवल्यानेंच त्यांना हवा असलेला रुचिपालट मिळतो, समजलीस वीणे ?

**वीणाः**—असेल बाई, तूं पडलीस कवयित्री! तुझ्या भावनाप्रवण, हळुवार मनालाच हें माझ्याहून अधिक कळणार!

**शारदाः**—म्हंजे? ह्या मंगलाताई कविता करतात?

**वीणाः**—होय ना!

**शारदाः**—वाः! बरं ह्या लीलेला गायला येतं कां?

**राधाः**—उंहुं. तिला नाहीं शिकवायला जमलं. पण आमची मंगला सुरेख गाते हं.

**मंगलाः**—इश्श! आई, हें ग काय तुझं? माझ्या गाण्यावरून कां लीलेची परीक्षा करायचीय् त्यांना!

**राधाः**—तसं नव्हे ग! पण माझ्या सांगण्याचा उद्देश हा कीं, तुझ्या लहानपणीं सगळी स्वस्ताई होती, माणसंहि मोजकींच होतीं, त्यामुळें तुला गाण्याच्या क्लासाला पाठवायला जमलं आम्हांला. पण लीलीला नाहीं पाठवतां आलं! पण ती गाणं शिकली असती तर तुझ्यासारखं छाऽन गातां आलं असतं!

**वीणाः**—तें असती कीं नसती काय करायचय् म्हणा! पण मंगला सुरेखच गाते हें मात्र अगदीं खरं!

**शारदाः**—वाः! वीणाताई इतकं नांवाजताहेत तर म्हण तरी एक गाणं, मंगलाताई.

**मंगलाः**—ह्या वीणेचं उगीचच कांहींतरी!

**वीणाः**—पण त्यांत काय झालं ग मंगले? आपल्याकडे आलेल्या माणसांना आपण चहापाणी देतों त्यांतलंच हें! म्हण ग एक—

**मंगलाः**—बऽरं बाई, म्हणतें—

(थोडा वेळ कोणतें गाणें म्हणावें हा विचार करते व नंतर एकदम एक विशिष्ट गाणें आठवल्यासारखें करते.)

**मम लाड कोण पुरवील।**
**तुजवांचुनि मायबाई ॥ मम लाड ॥ ध्रु० ॥**
**बाळपणींचा गोड खाउचा। वाढत्या वयीं साडिचोळीचा।**
**अन् तरुणपणीं मनच्या मनींचा। हट्ट कोण पुरवील ॥**
**मायबाई, लाड कोण पुरवील ॥ १ ॥**
**बाळपणीं खेळांतिल भांडण। वाढत्या वयीं सखिशीं तंडण।**
**अन् तरुणपणीं प्रीतिगुंजन। कोण हंसुनि आयकील।**
**मायबाई, लाड कोण पुरवील ॥ २ ॥**

( गाणें ऐकतांना राधाबाईंचें तोंड उतरतें. )

**शारदा**:—वाः ! खरंच छान गातात हं ह्या ! बरं, ( लीलेकडे बोट करून ) हिला कांहीं शिवणकाम वगैरे तरी येतं कां ?

( गाणं म्हणतांनां मंगला व ऐकतांनां राधाबाई जरा भावनाकुल झाल्या आहेत हें ओळखून लीला स्वतःच उत्तर देते.

**लीला**:—हो ! मींच शिवलाय् हा पोल्का नि वरतीं एंब्रॉयडरीहि मींच केलीय् !

**शारदा**:—होय कां ? कुसुम, बघ बरं तुझ्याइतपत एमरायटरी तिला येतेय्शी ? बाकी, नसली येत तरी तूं शिकवशील म्हणा तिला. बरं, शिक्षण किती झालंय् ? '

**मंगला**:—तीसुद्धां एम्. एफ्. आहे !

**शारदा**:—मग हरकत नाहीं ! आतां हें बघा, राधाबाई, मीं आपलं आधींच सारं स्पष्ट सांगून टाकतें हं. सुरेश आमचा एकुलता एक मुलगा ! चांगला ग्राज्वेट झालेला ! अन् लहानपणीं तीन वेळां मुदतीच्या तापांतून उठलाय् हो तो ! खरं म्हणजे, तो मोठा होऊन एवढ्या पदवीला येईल असं वाटलंऽच नाहीं आम्हांला ! हंऽ ! तेव्हां तुम्हांला हुंडा रोख पांच हज्जार द्यावा लागेल !

(राधाबाई ह्यावर कांहीं बोलणार, इतक्यांत मंगला त्यांनां हातानें गप्प रहाण्याची खूण करते. आपलें बोलणें मंगलेला योग्य वाटलें आहे असा शारदाबाई ह्याचा सोईस्कर अर्थ लावतात व खूष होतात )

**शारदा**: तुम्हांला पटलं ना हें मंगलाताई ?

**मंगला**:—हो ! तुमच्या मुलाची इतकी योग्यता खात्रीनें आहे !

( लीला अस्वस्थ होते. )

**शारदा**:—अगदीं ऽ बरोबर ! हें झालं हुंड्याचं ! आतां मुलीच्या अंगावर दहा तोळे बाळलेणं घाला अन् मान, पान, करणी नि निम्मा लग्नखर्च करा म्हणजे झालं ! अन् हो खरं, पहिल्या वर्षांतले बारा सण मात्र व्यवस्थिऽत करायला हवेत हं दिवाळीच्या सणाला जांवयाला आंगठी नि संक्रांतीला तिळगुळाला चांदीची वाटी द्यायची रीत असते !

**मंगला**:—( पुनः हळूच राधाबाईंना खूण करून ) म्हणजे एकूण एवढं देणं घेणं करायला हवं तर ? ऐका हं. हुंडा पांच हजार, दहा तोळे बाळलेणं, मानपान, करणी, निम्मा लग्नखर्च अन् पहिल्या वर्षांतले बारा सण—

**वीणा**:—दिवाळीला जांवयाला आंगठी नि संक्रांतीला वाटी विसरलीस मंगले ?

**मंगला**:—खरंच कीं ! आंगठी अन् वाटी—आतां बरोबर आहे ना ?

**शारदा**:—हो ऽ! बरोबर आहे!

**मंगला**:—ठरलं तर मग! वीणे, तूं नबुमावशीला सांग कीं, म्हणावं लीलीच्या लग्नांत आम्हीं एवढं देणं देणार नि अर्थात्‌च ह्या कुसुमच्या आई तेवढं देणं विभादादाला देणार!

( शारदाबाई दचकतात-राधाबाईंना व लीलेला बरें वाटतें )

**शारदा**:—( एकदम उठून उच्च स्वरांत ) म्हंजे? हें ग बाई काय? तें खटलं वेगळं! हें खटलं वेगळं! त्याचा इथें काय संबंध?

**मंगला**:—असं कसं बरं? विभादादा माझा सख्खा मावस भाऊ! तुमच्या मुलाला आम्हीं इतकं देणं दिलं तर आमच्या विभादादाला नको कां तितकंच मिळायला? खरं म्हणजे, त्याला थोडं अधिकच मिळायला हवं—

**शारदा**:—अहो, पण त्यांना मुळींच हुंडा न घेण्याबद्दल आपण अवश्य सांगूं असं नुकतंच म्हटलं ना तुम्हीं?

**मंगला**:—होय ना! पण त्यावेळीं मला वाटलं कीं, चहूंकडे हुंडा न घेण्याची चांगली पद्धत रूढ झाली असेल! पण तुम्ही हुंडा हवा म्हणतां मग नबु-मावशीनेंहि तुमच्याकडून घ्यायला हवा! कारण आमचा विभादादा डबल ग्रॅज्युएट आहे नि तीं माणसं चांगलींच सुखवस्तु आहेत!

**शारदा**:—मग अशा माणसांनीं हुंडा कां बरं घ्यावा?

**मंगला**:—अगदीं खरं आहे तुमचं म्हणणं. नि आमच्या मतें हुंडा कुणीच घेऊं नये. पण आतां तुम्ही हुंड्याची मागणी केलींत नि ती पुरी करण्याची शक्ति आम्हांला नाहीं! पण नबुमावशीनें आईला आश्वासन दिलेलं आहे कीं, लीलीच्या लग्नांत थोडीफार मदत करीन. पण आतां एवढे पांच हजार ती कुठून देणार हो? तेव्हां तुमच्याकडून तिनें सात, आठ हजार हुंडा घेतला तर तिच्या पदराला जराहि खार न लागतां ती आमची गरज व्यवस्थित भागवूं शकेल! तेव्हां अशा स्थितींत तिला हुंडा घेऊं नका असं कुठल्या तोंडानें आम्ही सांगणार?

**शारदा**:—मंगलाताई, हुंडा घेणं अगदीं गैर आहे हें आतां चांऽगलं पटलं हं मला! नको गऽबाई! एका हातानें पुष्कळ द्यायचं नि दुसऱ्या हातानें त्यांतलंच थोडं घ्यायचं हा द्राविडी प्राणायाम हवाच कशाला? छेः छेः चुकलं हो माझं. ही लीला आम्हांला पसंत आहे अन् तुम्हांला शक्य असेल तेवढंच देणं घेणं तुम्ही करा. आम्हीं तें मान्य करून घेऊं.

**मंगला**—अन् तुम्हांलाहि असंच सौजन्य दाखवण्याची आम्हीं नबुमावशीला गळ घालूं.

**राधाः**—अन् ती खात्रीनें आमचा शब्द मानील हो! खरं म्हणजे तिचं मत हुंड्याच्या विरुद्ध—

**शारदाः**—हुंड्याच्या विरुद्ध आहे होय त्यांचं मत?

**मंगला व वीणाः**—(घाईनें) छेः छेः

**मंगलाः**—तिचं मत हुंड्याच्या विरुद्ध नाहीं असं म्हणणार होती आई. पण शारदाबाई, तुम्हीं मुलींच काळजी करूं नका हं. आम्हीं नक्की तिचं मन वळवूं.

**वीणाः**—मीसुद्धां सांगीन त्यांना. तुम्ही अगदीं स्वस्थ रहा!

**शारदाः**—(एक निःश्वास सोडून) बरं ऽ झालं बाई! आतां तुमच्यावरच सोंपवलंय् मीं सगळं! हं ऽ! मी तरी कसली मेली दुतोंडी हो! वधूमाई म्हणून हुंड्याच्या विरुद्ध तोंडभर बोललें मी नि वरमाई होतांच माझी भाषा पार बदलली! कसलं भूत बसलं बाई माझ्या मानगुटीला?

**वीणाः**—(हंसून) अहो, तुम्हीं वधूमाई होतां त्या वरमाई होतांच, 'धू' चा 'र' होतांच त्याचा धूर तुमच्या डोळयांवर चढला! दुसरं काय?

**शारदाः** (हंसून) होय बाई! तसं ऽ च कांहीं तरी झाल खरं! बरं, येऊं आम्हीं आतां? नबुताईंना आमची सोय बघायला सांगा हं.

**राधाः**—आणखी आपण आमची सोय बघायची हं.

**शारदाः**—हो! तें तर ठरलंच! आतां पुढल्या आठवड्यांत साखरपुडा करूं या.

**वीणाः**—साखरपुडा नव्हे, साखरपुडे बरं कां. ह्यांच्या लेकीचा नि तुमच्या लेकीचा!

**शारदाः**—तसं ऽ च होऊं द्या. अन् मग पुढल्या-वैशाखाच्या-महिन्यांतच कार्यं उरकलीं म्हणजे बरं!

**राधाः**—हो, तसंच बरं! लीले, कुंकवाचा करंडा आण बाळ आंतला. (लीला आंत जाते) खरंच, सगळया विहिणी जर आपल्यासारखा समंजसपणा दाखवतील तर मुलीचं लग्न म्हणजे मोठं संकट असं नाहीं वाटायचं तिच्या आईबापांना. (लीला सर्वांना कुंकू लावते.)

**शारदाः**—बरं येतों हं मंगलाताई, वीणाताई, येतों हं. (लीलेला) येतों ग.

**राधाः**—यावं हं. (शारदाबाईंना व कुसुमला दारापर्यंत पोंचवतात.)

(मंगला व वीणा कोंचावर धाडकन् बसतात व लीलेला मध्यें बसवतात.)

**मंगलाः**—चढला ! लीलाबाई, बिनहुंड्यांत ठरलं बरं कां तुमचं लग्न ! ए वीणे, त्या शारदाबाईंना शह मात्र बिनतोड बसला हं !

**वीणाः**—तर ग ! माझी ती खात्रीच होती. म्हणूनच तर मीं मुद्दाम आलें. अग त्यांना आपला विभादादा फार म्हणजे फारच पसंत आहे, नि त्याच गोष्टीचा फायदा मिळाला आपल्याला !

**राधाः**- (खुर्चीवर बसून) म्हंजे ? वीणे, तूं नि मंगलेनें हें सारं योजून ठेवलं होतं होय ग ?

**वीणाः**—होय ना ! आज ऑफिसांत आल्याबरोबर मंगलेनें ह्या वधूपरीक्षेबद्दल मला सांगतांच ह्यांचीच मुलगी—ही कुसुम—विभादादानें परवां पाहिली हें माझ्या लक्षांत आलं. नि गरज पडली तर त्या गोष्टीचा आपल्याला उपयोग करितां येईल असं आम्हांला वाटलं. नि मंगला रजा घेऊन खारला आपल्या नबुमावशी-कडे गेली नि तिनें त्यांना हें सर्व सांगितलं. नि तशीच वेळ आल्यास, त्यांचा हुंडा घेण्याकडे कल आहे असं बेधडक शारदाबाईंनां सांगण्याची परवानगी हिनें मिळविली.

**मंगलाः**—नि शारदाबाईंच्या पांच हजारांच्या मागणीला सात, आठ हजारांचा शह नबुमावशीच्या नांवानं दिला ठोकून ! अन् आई, तुला हळूंच खुणा करून गप्प रहायला मीं सुचवलं नि तूं धीर धरून गप्प राहिलीसहि ! पण शेवटीं आनंदाच्या भरांत नबुमावशींचं मत हुंड्याच्या विरुद्ध आहे हें सांगून टाकीत होतीस कीं तूं !

**राधाः**---होय बाई, माझ्या तें ध्यानांतच राहिलं नाहीं ग.

**वीणाः**—पण मंगलेनें चटकन् आहेचं नाहीं. केलं ना ! अगदीं चक्क ह्या बोटा-वरली थुंकी त्या बोटावर केलीस हं, मंगले ! आणि मुलगीवाले कुळकर्णी सावकारहि कल्पनेनं बनवलेस हं!

**राधाः**—बाई, बाई ! तुम्हीं पोरींनीं बरीच धडपड केलींत म्हणायची ! नि त्याच-मुळें लीलुचं लग्न ठरलं हं ! शाबास !

**वीणाः**—खरं म्हणजे, ह्या लीलीनं आभार मानायला हवेत आमचे ! पण ही आपली घुमी बसलीय् नुसती ! काय ग लीले ?

**लीलाः**—वीणाताई, हें चाललंय् हें तुलासुद्धां ठीक वाटतं ना ? ताईच्या आधीं माझं लग्न होणार हें कसंतरीच वाटतंय् ग मला ! ताई बिचारी कसलाहि हट्ट धरीत नाहीं, पण त्याचा आपण असा गैरफायदा घ्यावा काय ?

**मंगलाः**—लीले, हें कसलं खुळ घेतलंयूस तूं? पुरें झालं हं. आतां पातळ बदल बरं. जा. हे पेलेबशीहि घेऊन जा आंत.

(मंगला पेलेबशी गोळा करूं लागते)

**लीलाः**—आई, ताईचं लग्न आतांच कर ना ग. बाबांना सांग तूं–अं!

**वीणाः**—खरंच काकू, लीला अगदीं योग्य तेंच सांगतेय्.

**राधाः** –हें बघ वीणे, भरल्यापोटीं सगळं शहाणपण सुचतं बरं! रिकाम्या पोटीं लीलीच्या तोंडून असे शब्द नाहीं हो उमटायचे–

**वीणाः**—पण म्हणजे काकू, मंगलेचं लग्नच करणार नाहीं तुम्ही?

**राधाः**—हुं! मीं ग कोण तिचं लग्न करणारी, न करणारी! तीच जर लग्न करायचं नाहीं म्हणतेय्–तूंच विचार कीं तिला!

**वीणाः**—मंगल' काय म्हणते तें ठाऊक आहे मला–पण तुम्ही काय......

**मंगलाः**—वीणे, तुला घरीं जायला उशीर नाहीं कां होणार? अन् खरंच नबुमावशीला कुठून तरी फोन करून इथली सारी हकीगत कळवतेस ना तूं? उद्या आई खारला जाऊन सगळं सांगेलच. पण तूं आतां तेवढा फोन कर.

**वीणाः**—अं–हो–हंऽ! बरं जातें मीं.

(कुणाचाच निरोप न घेतां जाते.)

**लीलाः**—मी पातळ बदलून येतें ग ताई.

(डाव्या बाजूच्या खोलींत जाते. राधाबाई अस्वस्थपणें इकडे तिकडे फिरतात. मंगला पेलेबशी गोळा करूं लागते.)

**राधाः**—(तिचा हात धरून तिला पुढें आणीत) मंगले, मघां तें गाणं कां म्हटलंस तूं? अं? 'मम लाड कोण पुरवलि, तुजवांचुनि मायबाई!' अगदीं खरं सांगितलंस! पण पोरी, मीं तरी काय करूं? संसार चालायला तुझ्या पगाराची मोठीच मदत होतेय म्हणून डोळ्यांवर कातडं ओढून आंधळी कोशिंबीर खेळतेंय् मी! मंगले, काय करूं ग?

**मंगलाः** –आई, तूं त्रास नको करून घेऊंस जिवाला.

**राधाः**—पण बाळ, तुझी आई ना मीं? हा संसार निर्वेध चालण्यासाठीं तुझा मीं बळी देणं चुकीचं आहे! मला हें कळत कां नाहीं? पण आडकित्त्यांत सांपडलेल्या सुपारीची गत झालीय माझी! दिवसेंदिवस इकडची प्रकृति अशक्त होतेय्. महागाई ही अशी! चार, सहा महिन्यांत पेनशण घ्यायची होणार! ह्या सगळ्या विवंचनांनीं भारीच कावून गेलें मीं! अन् त्यामुळें तुझ्या पगाराचा मोह पडतो मला! मंगले, मला सारं कळतंय्, पण–पण–वळत नाहीं ग!

**मंगला**ः –आई, तूं मुळींच खेद करूं नकोस. मला – मला लग्न करण्याची इच्छा नाहीं. मीं हें तुला कितीदां सांगितलंय्, रमाकाकूंना सांगितलंय्, वीगेला सांगितलंय्.

**राधा**ः –होय तें ठाऊक आहे मला. अन् मंगले, त्या त्या वेळीं तुझं तें सांगणं मला पटल्याचा आंवहि आणतें मीं. आतांसुद्धां लीलुकडे आणि वीगेकडे तेंच केलं मीं! पण–पण मंगले, मघां तूं तें गाणं म्हटल्यापासून माझ्या पोटांत कसं तुटतंय् बघ? खरंच, आईनं नाहीं, तर कुणीं पुरवायचे लेकीचे लाड? अन् लेकीचं हितगुजहि आईनेंच आवडीनें ऐकायचं असतं! पण पोरी, तुझं हितगुज कानीं पडूं नये म्हणून बळेंच कान बंद करून घेतें मी! तुझी कष्टी चर्या दिसूं नये म्हणून डोळे मुद्दाम मिटून घेतें. कसली ग ही मी मुलखावेगळी आई? (डोळे भरून येतात)

**मंगला**ः—आई, आई, तूं हें बोललीस तेवढ्यानेंच मला सारं भरून पावलं! आई ग, मला आतां किती हलकं वाटतंय्!

**राधा**ः—(डोळे पुसून) अन् मलासुद्धां किती हलकं वाटतंय्! मंगले, तुझ्या आधीं लीलेचं लग्न करणं म्हणजे मलाहि भारी अवघड वाटतंय् तें! पण—

**मंगला**ः—उंहुं! आई, आतां कांहीं बोलूं नकोस तूं! आई, तुम्ही सारीं माझीं माणसं आहांत नि तुमच्यासाठीं मीं थोडाफार त्याग करणं हें माझें कर्तव्यच आहे! पण आई, त्या कर्तव्याचं तूं आज कौतुक केलंस! बस्स, त्यांत मला सगळं भरून आलं! आजपासून अगदीं हंसतमुखानं, खऱ्या आवडीनं मी माझं हें कर्तव्य पार पाडीन! आई, ज्यांच्यासाठीं त्याग करायचा त्यांना त्याची जर हि जाणीव होऊं न देण्यांतच त्यागाची अन् त्याग करणाऱ्याच्या माणुसकीची कसोटी असते, हें मला कळूनहि वळत नव्हतं! मला समजत होतं, पण उमजत नव्हतं! आतां–आतां तें संपलं! आई, तुझ्या आतांच्या ह्या प्रेमळ शब्दांनीं मला तें उमजवलं! आई, माझी प्रेमळ आई!

(अत्यंत प्रेमानें राधाबाईंना बिलगते.)

**राधा**ः—(सद्गदित होऊन) हं ऽऽ! माझी शहाणी मंगला!

(एका हातानें तिला जवळ घेतात व दुसऱ्या हातानें डोळे टिपतात व हंसण्याचा प्रयत्न करतात.)

**(पडदा पडतो)**

## अंक दुसरा समाप्त

---

# अंक ३ रा

(स्थळः—मंगलेची खोली—डाव्या बाजूला एक लांबट टेबल, त्यावर एका साध्या फुलदाणींत कागदाचीं सुंदर फुलं, शिवणकामाचें सामान व २।४ पुस्तकें, जवळ एक खुर्ची—मध्यावर एक जुनी खाट असून तीवर एक रंगीत चादर घातली आहे व उशाला भरतकाम केलेला अभ्रा घातलेली उशी ठेवली आहे. पाठीमागें एक दोरी बांधली असून तीवर लुगडीं, पातळें व पोलकीं टाकलीं आहेत. समोर स्वयंपाक खोलींत जाण्याचें दार आहे व त्याच भिंतीशीं एकावर एक दोन जुने ट्रंक आहेत, व पलीकडे एक लांकडी शेल्फ आहे. त्यांत कपडे, पुस्तकें व बॉक्सें वगैरे आहेत. उजव्या बाजूला बाहेरच्या खोलींत जाण्याचें दार आहे.

(वेळः—संध्याकाळची. गेल्या अंकानंतर दीड महिन्यानें.)

(पडदा उघडतो)

(मंगला शेल्फमधील पुस्तकें लावण्याचा प्रयत्न करीत असते. पण विमनस्कतेमुळें तिला तें जमत नाहीं. पुस्तकें उभीं लावण्याऐवजीं आडवीं शेल्फवर ठेवून ती हळूंहळूं टेबलाकडे येते व खुर्चीवर बसते. टेबलाचा डावा खण उघडते व त्यांतून श्रीकांताचा एक कार्डाच्या आकाराचा फोटो बाहेर काढते.)

**मंगलाः**—श्रीकांत, श्रीकांत, काल काय ऐकलं मीं हें? आपल्या आईच्या इच्छेसाठीं तुम्ही मुली पहातां म्हणे!—पण—तुमची तरी काय चुकी? हं ऽ! तुमची नि माझी प्रीति हें देवाघरचं एक अपुरं काव्यच ठरणार तर! हं ऽ! तुमची नि माझी प्रीति!—श्रीकांत—

पद

**मोगरीची वेल। फुलली अंगणीं॥ अन् माझ्या मनीं। प्रीत तुझी॥**
**उगवे आकाशीं। पूर्णिमेचा चांद॥ घाली मज साद। प्रीत तुझी॥**
**नंदादीप तेवे। देवाच्या पुढतीं॥ अन् माझ्या चित्तीं। प्रीत तुझी॥**
**गीताचा निनाद। घुमे वाऱ्यावरी॥ माझिया अंतरीं। प्रीत तुझी॥**
**वाऱ्याची झुळुक। हेलावी पानांना॥ माझ्या भावनांना प्रीत तुझी॥**
**चंद्राहूनि शीतल। कुसुमांहूनि कोमल॥ स्निग्धाहुनि स्नेहल। प्रीत तुझी॥**
**सूर्याहुनि दिव्य। विश्वाहूनि भव्य॥ काव्याचेंहि काव्य। प्रीत तुझी॥**

(गाणें संपतां संपतां हळुंहळुं अंधार होतो. मंगला टेबलावर डोकें टेकते. असे २।३ क्षण जातात. अन् उजव्या बाजूच्या दारांतून लीला येते. तिच्या हातांत हिरवा चुडा व नव्या झिलईच्या पाटल्या, बांगड्या असतात; नऊवारी हिरवें लुगडें ती नेसलेली असते. कानांत मोत्याच्या ठळक कुड्या व कपाळाला ठळक कुंकू.)

**लीलाः**—ताईऽ (त्या हांकेसरशीं हळूंहळूं उजेड होतो. मंगला दचकून डोकें वर उचलते. फोटो उघड्या खणांत टाकून खण बंद करते.)

**मंगलाः**—(आनंदानें) कोण? लीला? ये ग. (तिला जवळ घेते) लीलु, लग्नानंतर आज पहिल्यांदा इथें येतेयूस् हं. किती दिवस झाले ग तुला पाहून.

**लीलाः**—होय ना. पंधरा दिवस झाले काल!

**मंगलाः**—पंधराच दिवस! मला पंधरा महिन्यागत वाटले ग ते! अन् लीले, तूं किती ग मोठी दिसूं लागलीस. अगदीं संसारी स्त्री दिसूं लागलीस हं. हे नऊवारी लुगडं, ह्या पाटल्या, बांगड्या, हें मंगळसूत्र, हा साज—

**लीलाः**—ताई ग, लग्न होतांच खरंच मोठी झालेंय् हो मीं.

**मंगलाः**—बरोबरच आहे! पंधरा दिवसांत तूं एका पंधरवड्यानें मोठी झाली असणारच! त्यांत ग काय एवढं सांगितलंस?

**लीला**: (गंभीरपणें) उंहुं! तसं नाहीं म्हणत मी, ताई! गेल्या पंधरा दिवसांत मला किनई पुष्कऽळ अनुभव आला जगाचा!

**मंगलाः**—म्हणजे? लीले, सासरीं चांगलं वागवतात ना तुला?

**लीलाः**—होय ग! फारच मायेनें वागतात सारीं माझ्याशीं! अन् ताई, त्याचमुळें माझे डोळे आतां खाड्कन् उघडले! ताई, आई, बाबा अन् मीं तुझ्या बाबतींत केवढा अन्याय करतोंय् त्याची पुरी जाणीव झालीय् मला!

**मंगलाः**—हंऽ! आलीस कां तूं पूर्वपदावर? लीले, तुला ठाऊक आहे ना, तुझ्या सासूबाई तुला पहायला आल्या होत्या त्या दिवशीं आईची नि माझी दिलसफाई झाली नि दिलजमाईहि झाली! आतां न्यायाचं नि अन्यायाचं नांवच काढायचं नाहीं!

**लीला**:—पण ताई, तुला बळजबरीनं निसर्गाविरुद्ध वागायला लावणं, सक्तीनं तुझ्यावर जन्माचं कौमार्य लादणं हा अन्याय नाहीं कां?

**मंगलाः**—लीले, आतां त्या वादाचं कारणच उरलं नाहीं! माझ्या जीवन-कहाणींतलं तें पान माझ्या लेखीं आतां कायमचं बंद झालंय्! ऐक. तुला एकदांच

सगळं सांगून टाकतें. काल रमाकाकू इथें आल्या होत्या. अन् स्वयंपाकघरांत त्या आईशीं बोलत बसल्या होत्या. त्या आईला म्हणाल्या कीं, 'राधाबाई तोंडानं तुम्हीं कांहीं म्हटलंत तरी मंगलेला ठेवून लीलीचं लग्न तुम्हीं कराल असं नव्हतं मला वाटलं! पण तुम्हीं आपलं तें खरं केलंत—तेव्हां आठ दिवसांपूर्वी मीं श्रीकांतला—'

**लीलाः**—'सांगितलं कीं, अजुनि वैशाखांतले पंधरा दिवस उरलेत, तेवढ्यांत तुझं लग्न उरकायचं नि श्रीकांतनेंहि तें कबूल केलंय्.'

**मंगलाः**—लीले, तुला कसं कळलं ग हें?

**लीलाः** –(कृत्रिम गांभीर्यानें) अग, वृत्तपत्रांत आली होती ना ही बातमी!

**मंगलाः**– चल! आचरट कुठली! लग्न झाल्यापासून तूं पोक्त झाली आहेस असं मघां मीं म्हटलं तें चुकलं हं! तूं अधिकच पोरकट झाली आहेस–बरं कां?

**लीलाः**—मग ताई, मीं सुखांत असल्याची साक्षच म्हणायची ती! कारण तुझं म्हणणंच आहे ना कीं, मन आनंदित असलं म्हणजेच चेष्टाविनोद सुचतो!

**मंगलाः**—लीले, तूं पूर्ण सुखांत आहेस हें कळल्यानें मला किती आनंद झाला म्हणून सांगूं!

**लीलाः**—अन् ताई, तूं तशी सुखांत नाहींस म्हणून मला तितकाच खेद होतोय् ग!

**मंगलाः**—अग, पण मी सुखांत नाहीं असं तूं समजतेसच कां मुळीं?

**लीलाः**— हें बघ ताई, दोन नकारांचा एक होकार होतो, हा भाषाशास्त्राचा नियम ठाऊक आहे बरं, मला! पण माझी खात्री आहे कीं, दोन नकारांनीं बनवलेल्या होकाराची किंमत स्वतंत्र होकारापेक्षां कमीच असते! मी सुखी आहे ह्या वाक्यापेक्षां 'मीं सुखी नाहीं असं नाहीं' हें वाक्य केव्हांहि गुळमुळीत लागतं!

**मंगलाः**—वाः वाः! लीले, तुझे सुरेश बी. कॉम्‌च आहेत कीं एल्. एल्. बी. हि झालेत ग? अगदीं शिस्तींत, वकिली थाटानें बोलते आहेस हो तूं आज!

**लीलाः**—म्हटलं ताईसाहेब, आपल्यापाशीं बिनतोड मुद्दे असले कीं, कायद्याचं शास्त्रशुद्ध ज्ञान नसतांहि माणसाला वकिली थाटानें बोलतां येतं हो!

**मंगलाः**—पण लीले, एवढी पंधरा दिवसांनीं आज भेटते आहेस तर सासरच्या चार गंमती, नाहींतर पतिराजांबद्दल नाजुक, साजुक हितगुज सांगायचं सोडून ही कसली चर्चा करीत बसली आहेस ग? नवरसांनीं थबथबणारं काव्य हाताशीं असतांना हें रुक्ष गद्य काय बाई, तुला आवडलं?

**लीलाः**—बरं हो, कवयित्री बाई, एकदम काव्यालाच हात घालतें हं मी. ताई, आमच्या सगळ्यांची चुकी निस्तारण्यासाठीं आज मुद्दाम मी इकडे आले आहे.

**मंगला**:—लीले, तूं चांगली समंजस आहेस. मग पुन्हां पुन्हां नको त्या विषया-कडे कां बरं वळते आहेस? कोणाचीहि चुकी झालेली असो, नसो! आतां ती निस्तारण्याचा प्रश्नच मुळीं उद्भवत नाहीं! तुलासुद्धां हें कळलंय्! मग कां उगीच तसला काथ्याकूट करायचा? लीले, एव्हांना-एव्हांना श्रीकांतांचं लग्न ठरलंसुद्धां असेल!

**लीला**:—ताई, हीच कां तूं श्रीकांतांची परीक्षा केलीस?

**मंगला**:—पण ह्यांत त्यांची काय ग चुकी? आईवडिलांचे एकुलते एक चिरंजीव ते!

**लीला**:—अन् त्यांच्या भावी पत्नीचे एकुलते एक पति नव्हेत कां ते? (मंगला तोंड फिरवते.) ताई, तोंड कां असं वाईट करतेस? अग, आपल्या आईची आपल्या मागची भुणभुण थांबवण्यासाठीं श्रीकांतांनीं युक्ति केलीय् ही!

**मंगला**:—युक्ति! म्हणजे?

**लीला**:—अग, वैशाखांतले आठ, दहा दिवस राहिलेत आतां. नि तेवढ्या मुदतींत श्रीकांत वधूपरीक्षेची नुसती टोलवाटोलवी करणार आहेत. मग पुढलां आहे ज्येष्ठ महिना–नि ज्येष्ठांत ज्येष्ठ मुलाचं लग्न होत नाहीं. अन् नंतर चातुर्मास लागतोय्! म्हणजे चार महिने थंडच बसायचं! असा डाव लढवलाय् त्यांनीं, सौभद्रांतल्या कृष्णासारखा!

**मंगला**:—खरंच! वाः! बरेच आहेत कीं ते! पण लीले, तुला कसं कळलं ग हें?

**लीला**:—अग, श्रीकांत नि हे एकाच ऑफिसांत आहेत नि चांगले मित्र आहेत.

**मंगला**:—अस्सं! तरीच! पण लीले, अशा रीतीनं चार, पांच महिने पदरांत पडून तरी काय उपयोग?

**लीला**:—होऽ! तेंहि खरंच!

**मंगला**:—(विस्मयानें) तेंहि खरंच? आणि हेंहि खरंच? असं काय ग दुटप्पी बोलते आहेस तूं, लीले? बाकी, माझंच चुकलं! ज्या गांवाला आपल्याला जायचंच नाहीं त्या गांवांच्या नांवाची तरी चौकशी कां करा?

**लीला**:—ताई, त्रासूं नकोस ग अशी! मस्करी केली मीं अंमळ! बाकी, मस्करी करण्याची ही वेळ नाहीं हें विसरलेंच मीं! ताई, हें बघ, माझ्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, हे चार, पांच महिने असे पदरांत पाडण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. कारण आपल्याला वैशाख महिन्यांतच कार्यभाग उरकायचाय्!

**मंगला**:—लीले, वेड तर नाहीं लागलं तुला ?

**लीला**:—मुळींच नाहीं ! ताई, आई स्वयंपाकघरांत भाजी चिरत बसलीय्. मीं बोलावलं की तूं इकडे ये असं मीं तिला सांगितलंय्.

**मंगला**:—तें कशाला ग ? लीले, आईला भलतं सलतं कांहीं सांगू नकोस हं.

**लीला**:—(मंगलेच्या वाक्याकडे दुर्लक्ष करीत) अन् रमाकाकूंना मीं बोलावलंच आहे. त्याहि इतक्यांत इथें येतील नि वीणाताईहि येईल.

**मंगला**:—हंऽऽ ! लीले, बाई, तुझा विचार तरी काय आहे ?

**लीला**:—कळेलच आतां ! पण ताई, तूं एक ऐकायलाच हवंस हं माझं ! हें बघ, मीं कांहिहि बोललें तरी तूं त्याविरुद्ध एक चकार शब्दसुद्धां बोलायचा नाहींस ! कळलं ना ? तूं आपली नुस्तं ऐक. आतां इथें होईल ती एक रेडियोवरली श्रुतिका आहे असं समज, म्हणजे झालं ! अर्थात्च तूं फक्त श्रोत्याचं काम करायचंस !

**मंगला**:—बऽरं बाई ! ह्या पंधरा दिवसांत खूप अनुभवी झाली आहेस म्हणे तूं ! तेव्हां तूं वडील बहीण नि मीं धाकटी बहिण, असंच घटकाभर समजेन मी !

**लीला**:—(आनंदानें) आतां कसं बोललीस ! (स्वयंपाकखोलीच्या दाराकडे जाऊन) आई, ए आई, इकडे ये ग जरा.

(राधाबाई व रमाकाकू येतात.)

**लीला**:—वाः ! रमाकाकूहि आल्या कां ? छान ! या बसा ह्या खाटेवर. आई, तूंहि बैस ना. (उजव्या बाजूच्या दाराकडे जात) विमले, अग, आपली वीणाताई आली कीं तिला इकडे पाठव हं.

(मंगलेला टेबलाकडील खुर्ची पुढें ओढून तिच्यावर लीला बसवते.)

**लीला**:—हं ! ताई, तूं अशी इथें बस. (वीणा येते)

**वीणा**:—लीले, कसलं ग एवढं जीवनमरणाच्या महत्त्वाचं काम आहे तुझं ! रामूबरोबर तूं आत्तां असा निरोप पाठवलास त्यामुळें फार घाबरले मी !

**लीला**:—(हंसून) अग, होय ! तेवढं महत्त्वाचंच आहे हें काम. तूं इथें बस बरं आईच्या शेजारीं. सगळं सांगतें मीं. पण आधीं मला असं सांग कीं, मुंज हा अधिक महत्त्वाचा संस्कार असतो कीं लग्न हा अधिक महत्त्वाचा ?

**वीणा**:—हा काय ग एकदम कसला विषय काढलास ?

**लीला**:—पण तूं उत्तर तरी दे.

**वीणा**:—अर्थात्च मुंजीहून लग्न हा संस्कार अधिक महत्त्वाचा !

**लीलाः**—होय ना ? मग मुंज झाल्यावर बटु जर द्विज होतो, त्याचा जणूं नव्यानें जन्म होतो, तर लग्न झाल्यावर वधूचा अधिक खऱ्या अर्थी नव्यानें जन्म नाहीं कां होत ?

**वीणाः**—हो होतो खरा ! लग्न झाल्यावर नांव, आडनांवसुद्धां बदललं जातं ना वधूचं ! अन् तिच्या कर्तव्यांचं क्षेत्रसुद्धां विस्तृत होतं. अग,

**असति स्त्रियांलागीं ऋणें जीं बहुविध संसारीं ।**
**विनाश्रमानें वा श्रमानें फेडी स्त्री सारीं ।**
**ऋणें जीं बहुविध संसारीं ॥ ध्रु० ॥**
**भलेपणा सासरिं मिळवोनि ।**
**माहेराचें ऋण तें फिटुनि ॥**
**जाई लवलाहीं । अनृणता येई तिच्या पदरीं ॥**
**प्रियपतीच्या पडत्या काळीं ।**
**पत्नी जरी हो त्याचि साउली ॥**
**योग्य मदत करुनि । फेडितें पतिऋण तीच खरी ॥**

**लीलाः**—एकूण लग्न हा इतक्या महत्त्वाचा, अगदीं जन्ममरणाच्या महत्त्वाचा मश्न आहे हें तूं कबूल करतेस तर ! नि आज एका लग्नाचा विचार करायचा आहे म्हणूनच मीं तुला बोलावलं. तेव्हां जीवनमरणाच्या महत्वाचं माझं काम आहे हें उघडच झालं !

**वीणाः**—बाई, बाई, लीले ! मी बी. ए. नि तूं एम्. एफ्. आहेस, पण आतां मला अगदीं हरवलंस हो बोलण्यांत !

**मंगलाः**—अग,होय ! आज हिच्या अंगांत काय वारं संचारलंय् कोण जाणे ! मघां मलासुद्धां असं कांहीं मुद्देसूद कायदेशीर व्याख्यान ऐकवलंय् म्हणतेस !

**लीलाः**—आज किनई, मी फार आनंदांत आहें !

**वीणाः**—हं ऽ ! लग्न मानवलेलं दिसतंय् बाईसाहेबांना ! नाहीं कां हो काकू ?

**लीलाः**—खरं सांगू का, वीणाताई, माझी लांड्या कोल्ह्यासारखी गत झालीय् ! माझं लग्न झालं म्हणून सगळ्यांचं व्हावं असं वाटतंय् मला ! बरं आई, आपल्या ह्या रमाकाकूंच्या तात्यांची पुण्याला बदली झाली म्हणे !

**राधाः**—होय हो रमाकाकू ? मग पुण्याला जाणार तर तुम्ही ?

**रमाः**—होय बाई, जायलाच हवं ! येत्या पहिलीला रूजू व्हायचंय्—तेव्हां आज आठा दिवशीं, येत्या रविवारीं निघूं म्हणतोय आम्हीं.

**वीणाः**—( मंगलेकडे पहात ) अन् श्रीकांतहि जाणार ?

**रमाः**—छेः ! तो ग कसा जाणार? त्याची नोकरी इथं मुंबईतच आहे ना ? तो एकटाच रहाणार इकडे.

**लीलाः**—हो. नि म्हणून मी असं सुचवतें कीं, आणखी चार दिवसांनीं, गुरुवारीं गोरज मुहूर्तावर ताईचं श्रीकांताशीं लग्न लावायचं ! आई, तुझी कांहीं हरकत आहे कां ? ( मंगला पटकन् उभी रहाते.) अं हं, ताई, तूं कां ऽ हीं बोलायचं नाहींस असं ठरलंय् आपलं ! हं, आई, सांग ना तुझी हरकत आहे कां ?

**राधाः**—माझी एरवीं काय हरकत असणार ग ? खरं सांगूं कां लीले, मंगलेला ठेवून तुझं लग्न करतांना भारी अवघड वाटलं मला ! पण काय करणार ? परिस्थितीचा पेंचच भारी चमत्कारिक पडलाय् !

**लीलाः**—ती काळजी नको तुला, आई ! माझी अशी सूचना आहे कीं, ताईचं श्रीकांताबरोबर लग्न झालं तरी त्या दोघांनींहि इथेंच रहायचं !

**राधा**
**रमा** } :—काय ? इथेंच ? ह्या घरीं ?

**लीलाः**—त्याला काय हरकत ? ताईच्या ह्या खोलींत त्यांनीं आपला चिमुकला संसार मांडायचा, नि जेवणखाण वगैरे सारं एकत्र करायचं ! अन् ताईनें पूर्वीप्रमाणेंच आपला पगार आईला द्यायचा ! श्रीकांतांच्या जेवणाखाणाचा खर्च वाढला तरी ताईच्या कपड्यालत्त्यांचा वगैरे सारा खर्च श्रीकांत त्यांच्या पगारांतून करणार ! कां कशी वाटते ही कल्पना ?

**राधाः**—मला फार पसंत पडली. पण—ह्या रमाकाकूंना !......

**रमाः**—हो ! ऐकतां क्षणीं वाटलं खरं मला अंमळ कसंसं ! पण आतां मलाहि पटलं हो ! कुठून तरी श्रीकांताच्या नि मंगलेच्या मनासारखं झालं म्हणजे पुरे ! लग्न झाल्यानंतर सुनेनें सासरीं रहाण्याऐवजीं जांवयानें सासुरवाडीला रहायचं,— हें अंमळ अप्रशस्त वाटतं—

**लीलाः**—पण काकू, तुम्ही इथें नसल्यामुळें श्रीकांतांना नाहीं तर खाणावळींतलं अन्न खावं लागलं असतं ना ? त्यापेक्षां हें पुष्कळ बरं नाहीं कां ? अन् लोकांचं हो काय ? चार दिवस टीका करतील नि त्यांना गरज ी कीं आपणहि तसंच करतील !

**वीणाः**—हें अगदीं खरं हं, लीले. तुझी ही कल्पना मला तर, बाई, फारच आवडली ! होऽ ! म्हणजे कुणालाच कुणाचं मिंधेपण नको ! लग्न झालेल्या

मुलीकडून संसाराला मदत घेणं तिच्या आईबापांना एरवीं अवघड वाटणार ! पण ही मदत नाहींच मुळीं ! मंगला नि श्रीकांत ह्या दोघांच्या अन्नखर्चाच्या नि घरभाड्याच्या पोटीं द्यायचे ते पैसे !

**रमा** :—होय बाई ! मला आतां नीट पटलं बरं ! अन् काय ग लीले, आमच्या श्रीकांताला तूं हें सांगितलं होतंस वाटतं ?

**लीला**:—( हंसून ) होय, काकू !

**रमा**:—( हंसून ) तरीऽच ! अग, आज सकाळीं तो लुचा मला म्हणतो कसा सावासारखा-म्हणे, आई, तुम्ही दोघं पुण्याला गेल्यावर तें खाणावळींतलं अन्न खायचं म्हणजे मला मोठ्ठं संकट वाटतंय् ग ! तिकडे विलायतेंत म्हणे पैसे घेऊन मध्यम कुटुंबांत जेवायूखायला ठेऊन घेतात गरजू माणसांना ! तशी प्रथा आपल्या इकडे पडेल तर कित्ती बरं होईल ! ढोंगी कुठला !

( सगळ्या हंसतात. मंगला गालांत जीभ घालून हंसते व लाजते. )

**लीला**:—खरंच काकू, तुम्हांला नि आईला ही योजना पसंत पडली म्हणून मला कित्ती आनंद झालाय् म्हणून सांगूं !

**वीणा**:—अन् काय ग, माझं नांव नाहीं तें कुठं घेतलंस ? ह्यांच्याबरोबर फिरायला जायला निघणार होतें मीं. इतक्यांत तुझा निरोप आला. नि म्हणून ह्यांना जरा थांबायला सांगून तश्शीच धांवत आलें मीं इकडे. नि तरीहि माझ्या मताला कांहींच किंमत नाहीं ना ?

**लीला**:—नाहीं कशी ? पण खरं सांगूं कां, वीणाताई, आईला नि रमाकाकूंना ही योजना इतक्या चटकन् पसंत पडेल असं मला नव्हतं वाटलं. अन् म्हणून तशी गरज पडल्यास त्यांच्याशीं वाद घालून तें पटवण्यासाठीं मीं तुला बोलावलं होतं ! तुला हें पटणार हें गृहीतच धरलं होतं मी !

**वीणा**:—अस्सं होय ? सगळा बेत व्यवस्थित आंखला होतास हं अगदीं !

**लीला**:—मग ? हे नि श्रीकांत असे दोघे मदतनीस होते ना मला !

**वीणा**:—होय कां ? बरं, मग आतां सगळं ठरलं ना ? रमाकाकू, तुम्हीं हुंडा मुळींच घेणार नाहीं अशी खात्री आहे माझी—

**रमा**: —तर ग ! ही मंगला म्हणजे केवढी बिनमोल हुंडी आहे ! नि ही मिळाल्यावर आणखी हुंडा कसला मागायचा ? ऐकलेंत ना राधाबाई, तुम्हीं नुसतं कन्यादान करा म्हणजे झालं ! आम्हांला दुसरं कांऽऽहीं नको !

**वीणाः**—लीले, तुझ्या सासूबाईपेक्षां मंगलेच्या सासूबाई बघितल्यास ना किती चांगल्या आहेत त्या !

**लीलाः**—तें खरें ग ! पण मूळच्या चांगल्या माणसापेक्षां मनाला पश्चात्ताप झाल्यामुळें ज्याचं परिवर्तन झालंयू त्या माणसाला जास्त मार्क नको कां द्यायला ?

**राधाः**—बघा हो कशी आपल्या सासूची बाजू घेतेय् ती ! असंच असतं हो ! म्हणतातच ना कीं, 'ज्याची होती त्यानें नेली, अपुली माया व्यर्थाची गेली !'

**रमाः**—तसंच व्हायला हवं ! आम्हां बायकांच्या मनाची ठेवण अशी लवचिक असते म्हणूनच सासरीं आपण इतक्या एकरूप होतों नि संसार सुखाचे करतों !

**वीणाः**—बरं मग उभयतां काकू, गुरुवारीं लाडू देणार ना ?

**राधा व रमाः**—होय तर !

**मंगलाः**—पण आई, बाबांना आवडेल कां हें ?

**राधाः**—बेश आवडेल बरं पोरी ! अग, बळेंच डोळ्यांवर पट्टी बांधून चक्क आंधळी कोशिंबिर खेळत होतों बरं आम्ही ! पण त्यामुळें जिवाला सुख नव्हतं ग आमच्या ! चारचौघांत गेलं कीं कसं चोरट्यासारखं वाटे आतांशा ! पण आतां कसं छाऽऽन झालं !

**रमाः**—हें मात्र अगदीं खरं हं ! अन् राधाबाई, मलासुद्धां मनापासून असंच वाटत असूनहि तुम्हीं मंगलेच्या लग्नाचा विचारहि करीत नव्हतां म्हणून, श्रासून श्रीकांताला मीं दुसऱ्या मुली पहाण्याची गळ घातली ! पण ( मंगलेकडे पाहून व तिची दृष्टादृष्ट होतांच हंसत ) तो कसला छट ! अहो, त्यानें खुशाल न पहातां सगळ्या मुली नापसंत केल्या. त्या वामनराव भिड्यांच्या सरलेवरून सकाळींच वाद झाला आमचा ! आपल्याला ती पसंत नाहीं असं खोलींत बसल्या, बसल्या सांगून मोकळा झाला कीं तो !

**वीणाः**—कोण ? सरला भिडे कां ? वाः ! छान ! श्रीकांतांचा नि तिचा जोडा नक्की दहाचा आंकडा दिसला असता !

**लीलाः**—दहाचा आंकडा ? वीणाताई, नवराबायकोमधली छत्तीसाचा आंकडा ऐकलाय, त्रेसष्टाचा आंकडाहि ठाऊक आहे. पण दहांचा आंकडा ! म्हणजे ग काय ?

**वीणाः**—हुंऽ ! तुम्हीं कोणीं त्या सरलेला हल्लीं पाहिली नसणार, म्हणून तुमच्या हें ध्यानांत येत नाहीं ! हें बघा, श्रीकांत असे ( हातानें दर्शवीत ) एकाच्या

आंकड्यासारखे उंच सडसडीत! अन् ती सरला शून्यासारखी (अभिनय करीत) हुप् वाटोळी! म्हणजे झाला कीं दहाचा आंकडा!

(सर्वजणी हंसतात.)

**राधाः**—(हंसत) वीणे, अश्शी वात्रट आहेस तूं!

**लीलाः**—आई, तुझा लहानपणींचा आनंदी, विनोदी स्वभाव हरवला होता ना हल्लीं–तो आज सांपडला बरं कां! म्हटलं, ताईसाहेब, थोरल्या जांवयांचा पायगुण चांगला झाला हो! (सर्वजणी हंसतात)

**वीणाः**--अन् ऐकलंत कां रमाकाकू, इंग्रजींत जांवयाला Son-in-law म्हणजे कायद्यानें मुलगा म्हणतात. मग तो मुलासारखा ह्या घरीं राहिला म्हणून काय बिघडलं?

**रमाः**--कांऽहीं बिघडत नाहीं बरं! मंगले, तूं मुळीं आशंकू नकोस हो! हें बघ, तूं आपल्या माणसांचं देणं व्यवस्थित दिलं आहेस–आईबापांचं ऋण व्यवस्थित फेडलं आहेस! आतां तुला मोकळ्या मनानें सुख भोगायला कांऽहीं हरकत नाहीं!

**वीणाः**--अगदीं बरोबर सांगितलंत हो आपल्या सूनबाईला. मंगले, आतां तुला जराहि अशुद्ध नि अवघड वाटायचं कारण नाहीं! खरंच, मलासुद्धां किती आनंद झालाय् म्हणून सांगूं! अन् रमाकाकू, आतां तुम्हीं पुण्याला गेल्यावर श्रीकांत इथें एकटे रहाणार म्हणून तुम्हांला काळजी वाटण्याचंहि कारण नाहीं! होऽ! मुलगी सुस्थळीं पडली म्हणून तिच्या आईबापांनां आजवर जसं हुश्श वाटे तसं आतां हल्लींच्या ह्या काळांत मुलगा सुस्थळीं पडला म्हणून त्याच्या आईबापांनां हुश्श वाटेल!

**मंगलाः**—वीणे, अति चेष्टा म्हणजे अस्वलाच्या गुदगुदल्याच बर कां!

**वीणाः**—पण मंगले, मी हें चेष्टेनेंसुद्धां बोललें नाहीं तर अतिचेष्टेचा प्रश्नच कुठें उद्भवतो? अग, आतां हळूहळू अशीच वेळ येणार आहे! आजकाल मुलांच्या बरोबरीनें मुली मिळवत्या होताहेत. तेव्हां जसं सोईला पडेल तसं तिनें सासरीं किंवा त्यानें सासुरवाडीला रहाण्याचं ठरविलं तरच मध्यम स्थितींतल्या तरुण–तरुणींच्या लग्नाचा प्रश्न बराच सुलभ होईल!

**रमाः**—मंगले, वीणा सांगते तें कांहीं खोटं नाहीं! अग, तुझ्या नौकरीवर मीं ज़ी सारखी उखडत असे ती मुलींनीं नौकरी करणं मला गैर वाटतं म्हणून नव्हे कांहीं! तर त्या नौकरीमुळें तुझ्या लग्नाच्या प्रश्नाकडे जाणूनबुजून काणाडोळा

केला जात होता म्हणून! ऐकलं ना राधाबाई, मंगलेनें नौकरी करण्यांत कांहींच आक्षेपार्ह नाहीं! आजकाल चहूंकडे मुली नौकऱ्या करतात. नि आपला पगार शिल्लक टाकून हुंड्याची भरपाई करतात! पण आम्हांला हुंडा घ्यायचाच नव्हता. त्यामुळें येतांजातां हिच्या त्या नौकरीला नि थोडाफार तुम्हांलाहि दोष देत असे मीं! पण हिनें नौकरी करायला कांऽहीं हरकत नाहीं हो!

**राधाः**—अन् रमाकाकू, तात्यांना पसंत पडेल ना ही सोयरीक? मीं उद्यां सकाळीं ह्यांना धाडतेंच हो रीतसर तात्यांकडे. पण—

**लीलाः**—उंहुं! आई, ती काळजी नको! तूं आतां जसा बाबांचा निर्वाळा दिलास तसा काकू तात्यांचा निर्वाळा देतीलच, पण मीहि तो देईन! कारण श्रीकांतांनीं तात्यांना हें सगळं सांगून त्यांची आगाऊ परवानगी घेतलीय् आज सकाळीं!

**वीणाः**—वाः! म्हणजे अगदीं 'रचिला ज्याचा पाया त्याची बरी उभारणी झाली' असंच सगळं पायाशुद्ध काम केलंस हं तूं, लीले! अन् हो खरं, रमाकाकूं तुम्ही पुण्याला गेल्यावर श्रीकांतहि इथेंच रहायला येणार. मग तुमच्या ब्लॉकचं काय करणार हो?

**रमाः**—आमचं अवजड सामानसुमान इकडेच ठेवणार आम्ही! अन् दीड, दोन वर्षांनीं परत इथें बदली होणार म्हणतात आमची! तेव्हां हा ब्लॉक आम्हीच ठेवणार

**राधाः**—अन् हें पहा, तेवढ्या मुदतींत आमचा रामू मॅट्रिक होऊन नोकरीलाहि लागेल! तेव्हां तुम्ही परत मुंबईत आलांत कीं तुमच्या सुनेला खुशाल आपल्या घरीं न्या! रामूचा पगार नि ह्यांची पेनशन एवढ्यांत आमचं चार माणसांचं सहज भागेल!

**वीणाः**—बरं, काकू, (रमाकाकूंना) तुमचं सामान तुमच्या ब्लॉकमधील एका खोलींत व्यवस्थित ठेवून बाकीची जागा आम्हांला द्या ना. तुम्ही केव्हांहि पुण्याहून परत आलांत कीं आम्हीं लगेच आमच्या ह्या जागेंत परत जाऊं. अं? चालेल?

**रमाः**—हो! न चालायला ग काय झालंय्? हे म्हणतच होते कीं, कोणीतरी भल्या माणसांना तोंवर द्यावी आपली जागा--

**वीणाः**--होय ना! मग काकू, आमच्या एवढीं भलीं माणसं दुसरीं कोण मिळणार हो तुम्हांला? (हंसत) आम्हांलाच द्या हं ती जागा.

**लीलाः**—(हंसून) वाः! वीणाताई, मोठी वस्ताद आहेस ग तूं! गोड, गोड बोलून बिनपगडींत छान जागा मिळवलीस!

**वीणाः**—अग, वरपक्षाच्या न्याय्य हक्काचा असं मानला जाणारा हुंडा घ्यायला जर ह्या रमाकाकू तयार नाहींत तर त्या पगडी कसली ग घेणार? अन् बरं कां, काकू, तुम्हांला पगडी हवीच असेल तर आमची मंगला आम्हीं तुम्हांला देणार तीच पगडीवजा समजा! म्हणजे झालं!

**लीलाः**—बरी गऽ बाई, हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवतेस हो तूं! बाकी, वीणाताई, मंगलाताईला पगडीची उपमा मात्र छान लागू पडतं हं! आता ती श्रीकांतांच्या डोकीवर बसणार, तेव्हां श्रीकांतांची पगडीच म्हणायची आमची ताई!

**मंगलाः**—लीले, तूंहि लागलीस हं त्या वीणेच्या नादाला!

**वीणाः**—मंगले, अग, असली गोड चेष्टा करून घेण्याचेच दिवस आहेत हे आतां तुझे! हें बघ, नवं, नवं, नवलाचं! नवलाईच्या ह्या चार दिवसांतच तुझी चेष्टा करणार कोणीं! आतां आमचंच पहा कीं! आमची करतंय् कां कोणी चेष्टामस्करी?

**राधाः**—अन् तूं करून घेणार होय ग, असली मस्करी? बघतां, बघतां, चेष्टा करणाऱ्याची तूंच चांगली चेष्टा उडवशील!

**वीणाः**—बरं, मंडळी, जातें मीं आतां.

**राधाः**—अग, पण चहा करतें मीं आतां. तोंड गोड करून जा बाई.

**वीणाः**—आतां नको. आतां गुरुवारीं लाडूच खायचे!

**राधाः**—बरं बाई-पण मी जातें चहा करायला. (रमकाकूंना) म्हटलं विहीणबाई, येतां स्वयंपाकघरांत?

(मंगला लाजते)

**रमाः**—हो. चला कीं विहीणबाई.

(दोघी हंसत हंसत स्वयंपाकघरांत जातात. वीणा खाटेवर बसते. व टुणूदिशीं परत उठते.)

**वीणाः**—मंगले, तुझ्या स्वार्थत्यागाचं आज सार्थक झालं! तुझ्या आईबापांनीं आजवर चालवलेली स्वतःची नि तुझी आंधळी कोशिंबीर आज संपली.

**लीलाः**—उंहुं! वीणाताई, ताईची आंधळी कोशिंबीर नाहीं हो एवढ्यांत संपायची!

(लीलेची ही कांहींतरी मस्करी असणार असें वाटून मंगला तिच्याकडे लाजऱ्या, रुसक्या चर्येनें पहाते.)

**वीणाः**—म्हणजे ग काय लीले? मला नाहीं कळलं!

**लीलाः**—बरोबर! तुझ्या लग्नाला चार महिने होतील ना आतां! लग्नानंतरच्या नव्या नवलाईचे आपले दिवस विसरलीस तूं! अग, हें बघ, (डाव्या खांद्यावरून मागें गेलेल्या आपल्या पदराचा शेव डाव्या हाताखालून पुढें ओढून मंगलेच्या बाजूला एका काल्पनिक व्यक्तीच्या डोळ्यांवर दोन्ही हातांनीं तो पट्टा बांधल्याचा अभिनय करीत) 'बांधुनि सख्याचे डोळे। आंधळी कोशिंबीर खेळे!' समजलीस? आपली मंगलाताई आतां असली आंधळी कोशिंबीर खेळणाराय्!

(वीणा व लीला हंसतात.)

**वीणाः**—खरंच कीं! पण लीले, ही आंधळी कोशिंबीर कित्ती कित्ती गोड! नाहीं कां? काय मंगले, तुझं काय बाई मत? अं? (हंसते) बरं जातें मीं आतां. फिरायला जाण्यासाठीं खोळंबले असतील हे!

**मंगलाः**—पण वीणे, एखाद्या दिवशीं मैत्रिणींकडे गप्पा मारीत बसल्यामुळें कुसुमवहिनींच्या भाषेंत बोलायचं म्हणजे आपल्या ह्यांच्याबरोबर फिरायला नाहीं गेलीस म्हणून काय झालं ग?

**वीणाः**—म्हटलं बाईसाहेऽब, हातच्या कांकणाला आरसा कशाला हवाय्? बघूं या कीं आतां गुरुवारनंतर तूं कितीशी मैत्रिणींच्या वाट्याला येशील तीं!

**लीलाः**—(मंगलेकडे तिरपा कटाक्ष टाकीत) पण वीणाताई, त्यासाठीं गुरुवारपर्यंत कशाला थांबायला हवं? अग, आतां इतक्यांतच श्रीकांत येणार आहेत हो इकडे!

**मंगलाः**—(चपापून) काय? खरं ग लीले?

**लीलाः**—होय ना! मीं आमंत्रणच दिलंय् त्यांना तुझ्या वतीनें! तेव्हां म्हटलं, ताईसाहेब, वीणाताईला जाऊं दे कीं राहूं दे?

**मंगलाः**—(लाजून) चल, चावट कुठची!

**वीणाः**—(कृत्रिम गांभीर्यानें) लीले, जाते गऽ बाई मीं! मंगलेनें घालवून देईपर्यंत कशाला बाई थांबूं? जातें हं, मंगले. (हंसत हंसत जाते.)

(मंगला क्षणभर स्तब्ध रहाते. मग स्वतःशींच स्मित करते. व लीलेजवळ जाते.)

**मंगलाः**—(लीलेच्या खांद्यावर हात ठेवून) लीले, केवढी करामत केलीस तूं आज!

**लीलाः**—ताई, तूं आम्हां सर्वांसाठीं कायमचा केवढा मोठा त्याग करायला आनंदानें

तयार झाली होतीस तें विसरण्याइतकी कृतघ्न आहे कां मी? ताई, माझं सुख मला टोंचत होतं! पण आतां तें संपलं! आतां माझ्या ताईला तिच्या योग्यतेसारखं सुख, आनंद मिळणार! ताई, माझं तें आवडतं सागरसरितेचं गाणं म्हणून दाखव बरं मला आतां. पण मागच्यासारखं रडवं नको हं! आतां आमची ही मुग्ध सरिता आपल्या सागराला मिळणार! अन् काय ग ताई, एकदां त्या सागरराजाला मिळाल्यावर ती परत वळेल कां त्या पर्वताकडे? अं? सांगा ना ताईसाहेब, बोला कीं.

**मंगलाः**—( भरल्या अंतःकरणानें ) काय बोलूं, लीले? जें निव्वळ दुष्प्राप्य, अशक्य आहे असं माझ्या मनाला मी शिकवीत होते तें तूं शक्य केलंस! लीले, माझं स्वप्न आतां साकार होणार!

**लीलाः**—होय. तुझी तपश्चर्या फळाला येणार! आतां गुरुवारीं संध्याकाळीं माझी ताई पिवळीं अष्टपुत्री नेसणार, कपाळाला केशराच्या मळवटावर कुंकुम-तिलक लावणार–अन् हे लांबसडक केंस पाठीवर मोकळे सोडून ह्या भाळाला मुंडावळ्या बांधणार, नि हिरवा चुडा घातलेले हे गोंडस, काम करून शिणलेले हात श्रीकांतांच्या गळ्यांत अस्सा हार घालणार.

( मंगला हंसते, लाजते व मग तृप्ततेचा निःश्वास सोडते. )

**लीलाः**—ताई, आतां म्हण ग तें गाणं. मनाच्या अशा तृप्त अवस्थेंत तुझ्या गोड गळ्यांतून तें गाणं ऐकण्यांत खरी गंमत आहे.

**मंगलाः**—म्हणतें हं.

( ‘ सागरराजा मिळतां त्याची प्रियसखी ’ हें पहिल्या अंकांतील पद भैरवी रागांत म्हणते. गाण्याचे सूर ऐकून हातांत गाळणें व सोधनें घेतलेल्या राधाबाई व रमाकाकू स्वयंपाकखोलीच्या दारांत येऊन उभ्या रहातात. व गाणें संपल्यावर हंसून एकमेकीकडे पहात परत जातात. )

**लीलाः**—( आनंदानें ) हं ऽ! आतां कसं छा ऽ न वाटलं!

**मंगलाः**—( खुळेपणानें ) लीले, खरंच येणार आहेत ग ते आतां? कीं तुझी आपली मस्करी?

**लीलाः**—अग, खरंच येणार आहेत. अन् ताई, अगदीं उतावळ्या नवऱ्याची गत झालीय हो त्यांची. उद्यांलाच मुहूर्त नाहीं का म्हणून विचारीत होते मला.

**मंगलाः** —चल! वात्रट कुठची! पण–लीले, मला जरा केंस-कुंकु सारखं नको कां मग करायला?

**लीलाः**—( मोठ्यांदा हंसत ) ओ हो ! हीच का आमची विरक्त ताई ? पण ताई, तशी कां ऽऽ हीं गरज नाहीं हं. तुझी ही हंसरी चर्या, गालावरचे हे लाजरे गुलाब, हे नाचरे बोलके डोळे–हें सारं इतकं सुंदर दिसतंय् कीं तुला आतां कसल्याहि नेपथ्यसाधनांची, कुठल्याहि आभूषणांची एवढीसुद्धां गरज नाहीं. ताई अग, कोणतीहि गुलाबी पावडर तुझ्या गालांना असा सुंदर रंग आणूं शकणार नाहीं ! डोळ्यांत अगदीं उत्तम सुरमा तूं रेखलास तरी ते इतके चमकणार नाहींत ! नि कसलीहि लिपस्टिक लावलीस तरी हे ओंठ इतके हंसरे दिसणार नाहींत ! म्हणून म्हणतें, ताई, तूं मुळींच नट्टंथट्टं नकोस–( दारावरील घंटा तीनदां वाजते ) अगबाई ! श्रीकांत–चुकलें हं, माझे भाऊजी आले वाटतं ! ताई, कळलं ना ? आपल्याला मंगला हवी आहे हें सांगण्यासाठींच त्यांनीं तीनदां घंटानाद केला—मं–ग–ला ! ( हंसते )

**मंगला** ( अतिशय लाजून ) इश्श !

**लीलाः**—ताई, चल, चल ग लौकर. मीं जातें हं. तूं ये झट्कन्.

( लीला जाते. )

( मंगला पट्दिशीं आरशांत बघून वेंस सांवरते व हळूंच टेबलाचा खण उघडून श्रीकांताचा फोटो हातांत घेते. )

**मंगलाः**—( फोटोला ) श्रीकांत, श्रीऽ ( फोटो वर उचलते. )

**लीलाः**—( बाहेरून ) ताई, ये ग लौकर. श्रीकांतभाऊजी अधीर झाले आहेत.

**मंगलाः**—( फोटो खणांत टाकून, हंसत ) आलें ग—

( मंगला एखाद्या अल्लड पोरीप्रमाणें नाचत चार पावलें जाते नि मग स्वतःशींच लाजून डौलांत पण उत्सुकतेनें चालत जाते. )

**( पडदा पडतो )**

**— समाप्त —**

